# जातककथा पुस्तक पहिले

लेखक : धर्मानंद कोसंबी

प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान

esahity@gmail.com

www.esahity.com

आभार : यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान

http://dharmanandkosambi.com/index.php?option=com_content&view=section&layout=blog&id=10&Itemid=143

या पुस्तकातील चित्रे जगभरातील विविध देशांतील जातक चित्रकथांतून गुगलवरून घेतली आहेत.



या पुढील पुस्तकांसाठी esahity@gmail.com वर संपर्क साधा

# धर्मानंद कोसंबी



महाराष्ट्राने जगाला अनेक विद्वान रत्ने दिली. अशांपैकी एक म्हणजे धर्मानंद कोसंबी. त्यांचा जन्म गोव्यामध्ये १८७६ साली झाला. लहानपणी त्यांना मराठी सोडून इतर कोणतीच भाषा येत नसे. परंतू शिक्षणासाठी त्यांनी घर सोडले आणि आधी पुणे, आणि नंतर उज्जैन, इंदौर, ग्वाल्हेर, प्रयाग, वाराणसी येथे त्यांनी संस्कृत व इंग्रजीचा अभ्यास केला. गृहस्थिती गरिबीची होती. बाहेर पडले तेव्हा प्रवासाच्या खर्चाला कमरेला पैसा नव्हता. टक्केटोणपे खात गुरूच्या शोधात हजारो मैल सापडेल त्या वाहनाने वा पायी प्रवास केला. बहुतेक पायी प्रवास अनवाणीच केला. अनेक वेळा पाय रक्तबंबाळ झाले, पुष्कळ वेळा चण्या-चुरमुऱ्यावरच भूक भागवावी लागली; वा उपाशीच राहावे लागले. पण त्यांनी अभ्यास सोडला नाही. त्यानंतर पाली व अर्धमागधी भाषांचा अभ्यास करत ते नेपाळ, श्रीलंका, ब्रह्मदेश आदी देशांत फ़िरले. या काळात त्यांनी बौद्ध धर्माचा सखोल अभ्यास केला. गौतम बुद्धाचे पहिले सविस्तर चरित्र त्यांनी संशोधन करून प्रथम मराठी आणि नंतर इतर भाषांत लिहिले.

धर्मानंदांना श्रीलंकेतील बौद्ध मठात बौद्ध विद्येचे गुरु भेटले. तिथे त्यांनी भिक्षुदीक्षा घेतली. तेथे पाली भाषा शिकून बौद्ध धर्माच्या ग्रंथांचे सांगोपांग अध्ययन केले. बौद्ध योगाच्या अभ्यासाकरिता दोनदा ब्रह्मदेशात जाऊन आले. जिवावर अनेक आपत्ती आल्या, परंतु बौद्धधर्माच्या विद्येचा ध्यास वाढतच गेला. पाली भाषेत ज्याप्रमाणे बौद्धधर्माचे अफाट साहित्य आहे, तसेच संस्कृतमध्येही आहे. त्या दोन्ही भाषेतील साहित्यांमध्ये या सात वर्षांत धर्मयात्रेत पारंगतता मिळविली. वयाच्या तिसाव्या वर्षापर्यंत चतुरस्त्र विद्वत्ता संपादन केली.

नंतर ते कलकत्ता विद्यापीठात प्राध्यापक झाले. त्यानंतर काही वर्षे पुण्याच्या फ़र्ग्युसन कॉलेजमध्ये (लो. टिळक, आगरकर, गोखले यांच्या काळात) शिकवल्यानंतर त्यांना इंग्लंडच्या ऑक्सफ़र्ड विद्यापीठातून शिकवण्याची आग्रहाची विनंती करण्यात आली. तिथे ते विद्यार्थ्यांना पाली, संस्कृत, अर्धमागधी भाषा आणि बौद्ध धर्माचा अभ्यास शिकवत असत. इंग्लंडमधीलच नव्हे तर जगातील सर्व देशांच्या विद्वानांकडून त्यांना फ़ार मोठे मानमरातब मिळाले.

पण हे सर्व मानसन्मान सोडून भारतीय स्वातंत्र्यलढ्यात भाग घेण्यासाठी ते पुन्हा भारतात आले. इथे ते गुजरात विद्यापीठामध्ये विनापगारी शिकवत असत. मीठाच्या सत्याग्रहात भाग घेतल्यामुळे त्यांना सहा वर्षांचा तुरुंगवास भोगावा लागला. या स्वातंत्र्य लढ्याच्या काळातच डॉ बाबासाहेब आंबेडकर यांची त्यांच्याशी ओळख झाली आणि बाबासाहेबांच्या जीवनावर कोसंबींचा अमीट असा ठसा उमटला.

डॉ. कोसंबींनी जैन धर्माचाही अभ्यास केला. आपला मृत्यू जैन मुनींप्रमाणे प्रायोपवेशनाने (उपोषणाने) व्हावा अशी त्यांची इच्छा होती. परंतू म. गांधीजींच्या विनंतीने ते दिवसातून एक चमचा काल्याचा रस घेत. त्यांचे निधन १९४७ साली वर्धा येथे म. गांधीजींच्या आश्रमातच झाले.

बौद्ध धर्म दोन हजार वर्षांपेक्षा अधिक कालपर्यंत निम्म्या मानवी जगात प्रचलित होता. त्याला पुन्हा नवा पाया देण्याचे आवश्यक कार्य धर्मानंदांनी केले आहे. बौद्ध धर्माला या विज्ञाननिष्ठ व बुद्धिवादी नव्या युगाच्या प्रेरणांना अनुरूप स्वरूप देणे आवश्यक होते. अद्‌भुत पौराणिक कथा, कल्पित प्रसंग, आणि पारलौकिक तत्त्वज्ञान यांची शेकडो पुटे मूळच्या विवेकवादी शुद्ध बौद्ध धर्मावर आणि बुद्धचरित्रावर शतकानुशतके चढलेली होती, त्यामुळे नव्या युगाच्या प्रेरणांशी सुसंगत असे त्याचे स्वरूप राहिलेले नव्हते. परंतु बुद्धचरित्राचे व बौद्ध धर्माचे मूळचे शुद्ध स्वरूप या

नव्या युगाच्या प्रेरणांशी सुसंगत असेच आहे, असे ध्यानात आल्यामुळे अनेक आधुनिक पश्चिमी पंडितांनी व विशेषत: धर्मानंदांनी ते स्वरूप यशस्वी रीतीने विवेकबुद्धीने शोधून काढले.

बुद्ध व बौद्ध धर्म ही जागतिक संस्कृतीला मिळालेली अलौकिक सर्वोत्तम देणगी असून ही भारताच्या प्राचीन इतिहासातील एक महान घटना आहे. मानवी संस्कृती शुद्ध नैतिक तत्त्वावर आधारलेली निर्माण करणे, हे आधुनिक मानवाचे परमपवित्र कर्तव्य आहे. हे कर्तव्य बजावण्यात मानवाला अपयश आल्यास विज्ञानाच्या सामर्थ्यावर आधारलेल्या भौतिक संस्कृतीसह मानवजात संपण्याचा धोका उत्पन्न झालेला आहे. म्हणून या जगाला तारण्याकरिता बुद्ध व बौद्ध धर्म यांची गरज आहे याची जाणीव त्यांनी जगाला करून दिली.

आचार्य धर्मानंदांनी बुद्धचरित्र व बौद्धधर्म यांचा वाङ्मयीन पाया घातला, त्या पायावर इमारत उभारायचे कार्य थोर दलित नेते डॉ. बोधिसत्व बाबासाहेब आंबेडकर यांनी सुरू केले. त्यांच्या कार्यास धर्मानंदांचा आधार मिळाला. धर्मानंदांनी लिहून प्रसिद्ध केलेले साहित्य हाच तो आधार होय. विचार हा संस्कृतीचा आधार असतो. धर्मानंदांच्या साहित्यातील विचारांचा गाभा त्रिकालाबाधित व अजरामरही आहे, असे म्हणता येते. डॉ. आंबेडकर यांच्या नव्या आंदोलनाने त्या विचारांना चांगला उजाळा मिळाला. त्या वैचारिक साहित्याच्या पाठीमागे फार मोठा त्याग होता. ज्या उच्च विचारांच्या पाठीमागे महान त्याग असतो, ते विचार अधिक प्रभावीपणे दीर्घकालपर्यंत मोठी प्रेरणा देत राहतात.

धर्मानंद कोसंबी यांनी बहुतेक सर्वच लेखन मोकळया सरळ अस्सल मराठीत केले हे विशेष. जातककथा हे त्यांपैकीच एक. ई साहित्य प्रतिष्ठान महापंडीत धर्मानंद कोसंबी यांचे हे पुस्तक वाचकांसाठी सादर करीत आहे.

# जातक कथा

जातक कथा म्हणजे जन्माच्या कथा. जन्म कथा.

बौद्ध  धर्मानुसार गौतम बुद्धाने बुद्ध जन्म घेण्यापुर्वी अनेकदा जन्म घेतला आणि स्वतःचे शुद्धीकरण केले. यात कधी हत्ती, कधी वृक्ष, कधी हरीण, वाघ, तर कधी मानवी जन्मात, व्यापारी, राजा, नोकर, सैनिक असे अनेक जन्म घेतले. या कथा खूप मनोरंजक आहेत. पण त्यांचा हेतू केवळ टाईमपास नसून समाजाला सोप्या सरळ पद्धतीने नैतिकतेचे धडे देणे हा होता. या कथा अडिच हजार वर्षांपुर्वी लिहील्या गेल्या. त्यानंतरच्या काळातल्या हितोपदेश, पंचतंत्र किंवा ईसापनिती आदी जगभरातल्या सर्वच गोष्टींवर जातक कथांची छाप जाणवते.

जातककथांच्या द्वारे बौद्ध धर्म जगाच्या अर्ध्या भागावर पोहोचला. कलाकारांना त्यांनि स्फ़ूर्ती दिली. अजिंठ्याच्या भिंतींवर असलेल्या चित्रे जातककथांचीच आहेत. वेरूळची सुमारे एक तृतियांश लेणीदेखील जातक कथांवर आधारित आहेत. जपान, इंडोनेशिया, अफ़गाणिस्तान, ब्रह्मदेश, नेपाळ, मलेशिया. थायलंड, चीन, व्हिएतनाम, लाओस, कांपुचिया अशा असंख्य देशांत हजारो लेणी, स्तुप आणि भित्तीचित्रांतून जातककथांची माहिती मिळते. आंध्र आणि महाराष्ट्र यांच्या सीमारेषेवर जन्मलेल्या या कथांनी संपूर्ण जग व्यापले आहे. जगातील सर्व भाषांमध्ये याची भाषांतरे झाली आहेत. किती गर्वाची गोष्ट आहे ना ही?

ई साहित्य प्रतिष्ठान मराठीमध्ये विनामूल्य ई पुस्तकांद्वारे जातककथा वितरित करत आहे. या कथा महान विद्वान धर्मानंद कोसांबी यांनी प्रचंड प्रयत्नांतून संकलित केलेल्या आहेत. या कथांतून आपण आपल्या मुलांवर संस्कार घडवावेत ही अपेक्षा आहे. कृपया या कथा जास्तीत जास्त वाचकांपर्यंत नेण्यासाठी आम्हाला मदत करा.

जातक कथा इंटरनेटवर विनामूल्य उपलब्ध करून देणाऱ्या यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठानचे आम्ही ऋणी आहोत.

टीम ई साहित्य

# हातचें सोडून पळत्याच्या पाठीमागें लागू नये

प्राचीन काळीं वाराणसीनगरांत ब्रह्मदत्त नांवाचा राजा राज्य करीत होता. त्या वेळीं आमचा बोधिसत्त्व एका मोठ्या सावकाराच्या कुळांत जन्माला येऊन वयांत आल्यावर पांचशें गाड्या बरोबर घेऊन परदेशी व्यापाराला जात असे. तो कधी पूर्वदिवशेला जाई, आणि कधी कधीं पश्चिम दिशेला जाई.

एका वर्षी पावसाळा संपल्यावर आमच्या बोधिसत्त्वानें परदेशी जाण्याची सर्व सिद्धता केली. त्याच वेळीं दुसरा एक व्यापारी आपल्या पांचशे गाड्या घेऊन त्याच रस्त्यानें जाण्यास तयार झाला होता. त्याला बोधिसत्त्व म्हणाला, "मित्रा, आम्ही दोघे जर एकदम एकाच मार्गानें गेलों, तर आमच्या बैलांना वैरण मिळण्यास अडचण पडेल. आमच्या माणसांनाहि शाकभाजी बरोबर मिळणार नाहीं तेव्हां आमच्यापैकीं एकानें पुढें जावें, व दुसऱ्यानें आठ पंधरा दिवसांनी मागाहून जावें हें बरं."

तो दुसरा व्यापारी म्हणाला, "मित्रा, असें जर आहे, तर मीच पुढें जातों. कां कीं माझी सर्व सिद्धता झाली आहे. आतां येथें वाट पहात बसणें मला योग्य वाटत नाहीं."

बोधिसत्त्वाला ही गोष्ट पसंत पडली. त्या व्यापाऱ्यानें पुढें जावें व बोधिसत्त्वानें पंधरा दिवसांनी त्याच्या मागाहून जावें असा बेत ठरला. तेव्हां तो व्यापारी आपल्या नोकरांस म्हणाला, "गडे हो, आजच्या आज आम्हीं प्रवासाला निघूं. पुढें जाण्यामुळें आम्हाला पुष्कळ फायदा होणार आहे. आमच्या बैलांना चारापाणी यथेच्छ मिळेल, व आमच्या मालाला दामदुप्पट किंमत येईल."

पण बोधिसत्त्वाच्या अनुयायांना हा बेत आवडला नाहीं. ते आपल्या मालकाला म्हणाले, "तुम्ही हें भलतेंच काय केलें ! आमची सर्व तयारी आगाऊ झाली असतां तुम्ही त्या गृहस्थाला पुढें जाण्यास अनुमति दिली हें काय ? आम्हीं जर त्याला न कळवितां मुकाट्यानें पुढें गेलों असतों तर आमच्या मालाचा चांगला खप होऊन आपल्या पदरांत पुष्कळ नफा पडला असता."

बोधिसत्त्व म्हणाला, "तुम्ही म्हणतां अशी गोष्ट घडून आली नसती. मी जर त्याला न कळत पुढें जाण्यास निघालों असतों, तर त्याला माझा फार राग आला असता, व त्यामुळें आम्हां दोघांमध्ये भयंकर स्पर्धा जुंपली असती. आतां पुढें जाण्यांत विशेष फायदा आहे, असे तुम्हांस वाटतें; परंतु हेंदेखील ठीक नाहीं. पावसाळयामुळें नादुरुस्त झालेले रस्ते पुढें जातांना करावे लागतील; नदीपार जाण्यासाठी उतार शोधून काढावा लागेल; व जंगलांत झरे किंवा विहिरी बुजून गेल्या असतील त्या साफ कराव्या लागतील. जर त्याच्या मालाला चांगली किंमत आली तर एकदां भाव ठरल्यामुळें आम्हालाही त्याच किंमतीनें आमचा माल विकतां येईल. एकंदरीत तो पुढें गेला असतां आम्हाला कोणत्याहि तऱ्हेनें नुकसान नाहीं."

त्या वेळीं जंबुद्वीपामध्यें पांच प्रकारची अरण्यें असत. ज्या अरण्यांत चोरांची वस्ती असे त्याला चोरकांतार असें म्हणत; जेथें हिंस्त्र पशूंची वस्ती असे त्याला व्यालकांतार म्हणत असत; ज्या ठिकाणीं पिण्यालादेखील पाणी मिळत नसे, त्याला निरुदककांतार म्हणत असत; यक्षराक्षसादिकांची जेथें पीडा असे, त्याला अमनुष्यकांतार असें म्हणत; आणि ज्या ठिकाणी अन्नसामग्री मिळण्याची मारामार पडे त्याला अल्पभक्ष्यकांतार असे म्हणत.

बोधिसत्त्वाच्या मार्गात जे मोठे जंगल होते, तेथे पाण्याचा दुष्काळ असल्यामुळें आणि यक्षांची वस्ती असल्यामुळें त्याला निरुदककांतार आणि अमनुष्यकांतार असें म्हणत. बोधिसत्त्वाच्या साथीदारानें आपल्या लोकांसह ह्या जंगलाजवळ आल्यावर पाण्याची मोठमोठालीं मडकीं भरून गाड्यावर चढविलीं, आणि तो जंगलांतून पार जाऊं लागला. वारा पुढच्या बाजूला असल्यामुळें आपणाला धुळीची बाधा होऊं नये या हेतूनें त्या व्यापाऱ्यानें आपली गाडी सर्वांपुढें चालविली होती.

एक दोन दिवसांच्या रस्त्यावर गेल्यानंतर उलट दिशेनें एक व्यापारी सफेत बैलाच्या गाडींत बसून आपल्या नोकरांसह येत असलेला त्याच्या पाहण्यांत आला. त्या व्यापाऱ्यानें आणि त्याच्या नोकरांनीं स्नान करून गळयांत कमलांच्या माळा घातल्या होत्या. त्याला पाहून वाराणसीहून निघालेल्या व्यापारानें आपल्या गाड्या उभ्या करविल्या व आपण खालीं उतरून त्याजजवळ गेला.

प्रतिपथानें येणाऱ्या त्या गृहस्थानेंहि आपली गाडी उभी केली व तो खालीं उतरून वाराणसीच्या सार्थवाहाला म्हणाला, "आपण कोठून आलांत व कोणीकडे चाललांत ?"



सार्थवाह म्हणाला, "मी वाराणसीहून निघून ह्या जंगलाच्या पलीकडील प्रदेशांत व्यापारासाठीं जात आहे."

गुहस्थ म्हणाला, "ठीक आहे; पण आपल्या ह्या मागून येणाऱ्या गाड्यांवर मोठमोठाली मडकीं दिसताहेत ती कोणत्या पदार्थानें भरलीं आहेत ?"

सार्थवाह म्हणाला, "हें जंगल निरुदककांतार आहे असें आमच्या ऐकण्यांत आल्यामुळें आम्हीं हीं मडकीं पाण्यानें भरून बरोबर घेतलीं आहेत."

तो गृहस्थ मोठ्यानें हंसून म्हणाला, "वः ! हें कांही तरी भलतेंच तुमच्या ऐकण्यांत आलें. पलीकडे ती हिरवी गार झाडी दिसते की नाहीं, तेथें तुडुंब भरलेला एक मोठा तलाव आहे. त्या भागांत बारमाही पाऊस पडत असल्यामुळें पाण्याची टंचाई अशी कधींच पडत नाहीं. नुकताच तेथे पाऊस पडल्यामुळें आमच्या गाड्यांची चाकें चिखलानें भरून गेलीं आहेत तीं पहा. आमचे बैल भिजून गेले आहेत आणि पावसाच्या झडीनें भिजलेलीं आमची वस्त्रें अद्यापि वाळून गेलीं नाहींत. आपण हीं पाण्याची भांडी गाड्यावर लादून बैलांना विनाकारण त्रास देत आहां ! बरें, आतां उशीर झाला. सहजासहजीं गांठ पडल्यामुळें आपला परिचय घडला. पुढें कधी गांठ पडली तर ओळखदेख असूं द्या म्हणजे झालें."

सार्थवाह म्हणाला, हें काय विचारतां. आपण ह्या बाजूनें आलांत म्हणून आमचा फार फायदा झाला. दंतकथांवर विश्वास ठेवून आम्ही आमच्या गाड्यांवर हें पाण्याचें ओझें लादून नेत होतों. पण आतां त्याची जरूरी राहिली नाहीं. नमस्कार, अशीच मेहेरबानी राहूं द्या.

तो गृहस्थ आपल्या नोकरांसह तेथून निघून गेल्यावर सार्थवाहानें मडक्यांतील पाणी फेंकून देण्यास लाविलें, व तीं मडकी तेथेंच टाकविलीं. आतां बैलांचे ओझें हलकें झाल्यामुळे गाड्या त्वरेनें चालल्या होत्या. परंतु सारा दिवस मार्ग क्रमण केल्यावरदेखील पाण्याचा पत्ता लागेना ! तेव्हां यक्षांनी आपणाला आणि आपल्या लोकांना फसविण्यासाठीं अशी युक्ती लढविली असली पाहिजे, ही गोष्ट त्या सार्थवाहाला लक्ष्यांत आली.

पण

**"चौरे* गते वा किमु सावधानं**

**निर्वाणदीपे किमु तैलदानम्"**

(* चोर पळून गेल्यावर सावध सावध म्हणून ओरडण्यांत काय फायदा ! किंवा दिवा विझल्यावर तेल घालून काय उपयोग !!) ह्या म्हणीप्रमाणें संग्रहीं असलेलें पाणी कधींच जमिनींत मुरून गेलें होतें !

त्या सार्थवाहाच्या तांड्यांतील सर्व लोक हताश होऊन गेले, आणि बैलांना मोकळे सोडून गाड्या वर्तुळाकार रचून आपापल्या गाडीखालीं शोकमग्न होऊन बसले. तेव्हां त्यांच्या अंगीं त्राण राहिलें नाहीं अशी त्या धूर्त यक्षाची पक्की खात्री झाली, तेव्हां त्या तांड्यावर तो तुटून पडला; व आपल्या अनुयायांना म्हणाला, "गडे हो, माझी युक्ति सिद्धीला जाणार नाहीं असें तुम्हाला वाटलें होतें परंतु तो सार्थवाह हातचें सोडून पळत्याच्या पाठीं लागणारा असल्यामुळें माझा पाय त्यावर बिनचूक पडला. आज तुम्ही यथेच्छ भोजन करा. अशी पर्वणी पुन्हां येईल कीं नाहीं याची मला शंकाच आहे."

गाड्यांतील सामानसुमान आणि गाड्या तेथेंच टाकून देऊन यक्षांनी सर्व बैलांना आणि माणसांना खाऊन टाकिलें, आणि मोठ्या हर्षानें नाचत उडत ते आपल्या निवासस्थानाला गेले.

त्या मूर्ख सार्थवाहाला वाराणसीहून निघून पंधरवडा झाल्यावर आमचा बोधिसत्त्व आपल्या नोकरांसह वाराणसीहून निघून अनुक्रमें प्रवास करीत करीत त्या जंगलांजवळ आला. तेथें आपल्या सगळया लोकांना एकत्र जमवून तो म्हणाला, "गडे हो हें निरुदककांतार असून अमनुष्यकांतारहि आहे. तेव्हां तेथें आम्ही मोठ्या सावधपणानें वागलें पाहिजे. जर वाटेंत तुम्हाला कोणी भलतेंच फळ, मूळ, दाखवील तर तें तुम्ही खातां कामा नये; अपरिचित शाकभाजीचा तुम्ही आपल्या अन्नात उपयोग करितां कामा नये; किंवा अन्य कोणतीहि विशेष गोष्ट घडून आली, तर ती ताबडतोब मला सांगितल्यावांचून राहतां कामा नये."

बोधिसत्त्वाच्या म्हणण्याप्रमाणें वागण्याचें त्या सर्वांनी कबूल केलें. बोधिसत्त्व अत्यंत व्यवहारनिपुण असल्यामुळें आपल्या हिताहिताचें ज्ञान त्याला विशेष आहे, असें जाणून त्यांनी आपला भरिभार त्यावर सोंपविला.

त्या मुख्य सार्थवाहाला आणि त्याच्या अनुयायांना दुर्बळ करून मारून खाल्ल्यापासून यक्षांना मनुष्यमांसाची विशेष गोडी लागली होती. पूर्वीप्रमाणें त्यांनी आपलें स्वरूप पालटून ते बोधिसत्त्वाच्या लोकांपुढें आले; आणि जवळ पाण्याचा तलाव आहे इत्यादि वर्तमान त्यांनी सांगितलें. बोधिसत्त्व सर्वांच्या मागल्या गाडीवर बसून चालला होता. पुढें चाललेले त्याचे नोकर धांवत धांवत येऊन त्याला म्हणाले, "धनीसाहेब, आतांच हा एक व्यापारी दुसऱ्या बाजूनें आपल्या

नोकरचाकरांसह येत आहे. त्या सर्व लोकांच्या गळयांत कमलांच्या माळा आहेत. आणि त्यांच्या गाड्यांची चाकें चिखलानें भरलेलीं आहेत. ते सांगतात कीं, पलीकडे जें हिरवेंगार अरण्य दिसतें तेथे एक तलाव आहे व त्या भागांत बारमाही पाऊस पडत असतो, तेव्हां आम्हीं ही पाण्याची भांडीं वाहून नेण्यापेक्षां येथेंच टाकून दिल्यास आमच्या बैलांचे ओझें कमी होईल, व त्या तलावाजवळ आम्हीं लवकरच पोहचूं."

बोधिसत्त्व म्हणाला, "गडे हो, तुम्ही माझ्या हुकुमाबाहेर चालूं नका. पाण्याचा थेंब देखील फुकट खर्च होऊं देऊं नका. आतां जवळ पाऊस पडत आहे असें तुम्ही म्हणतां, पण पावसाची हवा एकाच्या तरी अंगाला लागली आहे काय ? किंवा आकाशामध्यें एक तरी ढग दिसत आहे काय ?"

ते म्हणाले, "आम्हाला ढग दिसत नाहीं; विजेचा कडकडाट ऐकुं येत नाहीं; किंवा आम्हाला थंड हवाहि लागत नाहीं. परंतु ज्या अर्थी तो सभ्य गृहस्थ आणि त्याचे इतके नोकरचाकर मोठा तलाव असल्याचें सांगत आहेत, एवढेंच नव्हे, तर त्यांपैकी पुष्कळांच्या गळयांत कमलांच्या माळा आहेत, त्या अर्थी त्यांच्यावर विश्वास ठेवण्यास हरकत नाहीं."

बोधिसत्त्व म्हणाला, "पण विश्वास ठेवण्याची एवढी घाई कां करा ? आणखी एका योजनाच्या अंतरावर तलाव आहे असें जर तो गृहस्थ सांगत आहे, तर आपण तेथें जाऊन हें पाणी फेंकून देऊं, व पुढें जरूर वाटल्यास त्या तलावाचें पाणी भांड्यांत भरून घेऊं. आजचा दिवस बैलांना थोडा त्रास पडला तरी हरकत नाहीं."

बोधिसत्त्वाच्या हुकुमाप्रमाणें त्याच्या लोकांनी पाणी बाहेर टाकिलें नाहीं. त्या सभ्यपुरुषवेषधारी यक्षानें पुष्कळ आग्रह केला; परंतु त्या लोकांची बोधिसत्त्वावरील श्रद्धा ढळली नाहीं. तेथून दुसऱ्या मुक्कामावर गेल्यावर सामानानें लादलेल्या पांचशें गाड्या आणि इतस्ततः पडलेल्या बैलांचे व माणसांचे अस्थिपंजर त्यांना आढळले. तेव्हां बोधिसत्त्व म्हणाला, "गडे हो, पहा! हा आमचा मूर्ख सार्थवाह आपल्या लोकांसह नाश पावला ! आपल्या जवळील पाणी नवीन पाणी सांपडल्यावांचून यानें जर फेकून दिलें नसतें तर हा आपल्या लोकांसह यक्षांच्या भक्ष्यस्थानीं पडला नसता. हातचें सोडून पळत्याच्या पाठीं लागणाऱ्यांची ही अशीच गत होत असते !"

त्या गाड्यांवरील बहुमोल सामानसुमान आपल्या गाड्यांवर घालून आणि आपल्या गाड्यांवरील अल्पमोल वस्तु तेथेंच टाकून देऊन बोधिसत्त्व आपल्या लोकांसह सुखरूपपणें त्या कांताराच्या पार गेला, व तेथें मोठा फायदा मिळवून पुनः सुरक्षितपणें वाराणसीला आला.

* प्रत्यक्ष आर्य वदती स्थान दुर्जे तार्किकास आवडतें ॥

जाणोनि तत्त्व सुज्ञें सोडूं नये कुशलकर्म जें घडतें ॥१॥

मूळ पाली गाथा अशी आहे –

अपण्णकं ठानमेके दुतियं आहु तक्किका ।

एतदञ्ञाय मेधावी तं गण्हे यदपण्णकं ॥

# प्रयत्नाचें फळ
## (वण्णुपथ जातक नं. २)

आमचा बोधिसत्व काशीराष्ट्रामध्यें सार्थवाह कुळांत जन्माला येऊन वयांत आल्यावर आपल्या पित्याचा धंदा करीत असे. एकदां तो व्यापारासाठीं मरुमंडळांतून जात असतां वाटेंत एका साठ योजनें लांबीच्या वाळूच्या मैदानाजवळ आला. ह्या मैदानांतील वाळू इतकी सूक्ष्म होती कीं ती मुठींत देखील रहात नसे. सकाळीं पहिल्या प्रहरानंतर ह्या मैदानांतून प्रवास करण्याची सोय नव्हती. सूर्यकिरणांनीं वाळू संतप्त होऊन जात असल्यामुळें तिच्यावरून माणसाला अगर जनावराला चालत जाणें शक्यच नव्हतें.

बोधिसत्त्वानें ह्या मैदानाजवळ आल्यावर एक वाटाड्या घेतला. हा एक वाळूचा मोठा समुद्रच असल्यामुळें वाटाड्यावाचून तरून जातां आला नसता. तो वाटाड्या पुढच्या गाडींत एका चौरंगावर बसून आकाशांतील ताऱ्यांच्या अनुरोधानें त्या लोकांना रस्ता दाखवीत असे. सर्व रात्र प्रवास करून सूर्योदयाचे वेळीं सर्व गाड्या एका ठिकाणीं वर्तुळाकार ठेवीत असत, व त्यावर तात्पुरता मंडप करून त्या खालीं सगळीं माणसें आणि जनावरे सारा दिवस विश्रांति घेत असत.

याप्रमाणें आमचा बोधिसत्त्व व त्याबरोबर असलेले लोक त्या वालुकाकांतारांतून जात असतां दुसऱ्या टोंकाला आले. आतां जवळचीं गांवें एका मुक्कामाच्या पल्ल्यावर राहिलीं होतीं. तेव्हां तो वाटाड्या म्हणाला, "आम्हीं वाळूच्या मैदानांतून गांवाच्या नजीक येऊन पोहोंचलों. आज रात्रीं ह्या मुक्कामाहून निघालों म्हणजे उद्यां सकाळीं आम्हीं एका संपन्न गांवाला जाऊन पोहचूं. आतां पाणी आणि लांकडे बरोबर घेण्याचें कांही कारण राहिलें नाहीं."

त्या वाटाड्याच्या सांगण्याप्रमाणें बोधिसत्त्वाच्या लोकांनी सर्पण आणि पाणी तेथेंच टाकून देऊन ते पुढल्या प्रवासाला निघाले.

एक दोन आठवडे वाटाड्याला रात्रीं मुळींच झोंप न मिळाल्यामुळें तो अगदीं थकून गेला होता. मध्यरात्रींच्या सुमारास बसल्या ठिकाणींच त्याला नीज आली, आणि त्याची गाडी भलत्याच मार्गानें वळली हें त्याला समजलें देखील नाहीं. अवशेष रात्र बैल चालत जाऊन पुनः मागल्या मुक्कामावर आले. वाटाड्याच्या गाडीच्या मागोमाग इतर गाड्या चालत असल्यामुळें त्या सर्व तेथें येऊन पोहोंचल्या. अरुणोदयाचे सुमारास वाटाड्या जागा होऊन पाहतो तों त्याला आपण पूर्वीच्याच ठिकाणीं येऊन पोंचल्योचें समजून आलें, आणि तो मोठ्यानें ओरडला. "गाड्या मागें फिरवा. मागें फिरवा."

त्या मंडळींत फारच गडबड उडून गेली. आपण कोठें पोंचलों, हें कोणास समजेना. वाटाड्याच्या सांगण्याप्रमाणें गाड्या माघाऱ्या वळवण्यांत आल्या. परंतु इतक्यांत सूर्योदय झाला. गाड्या वर्तुळाकार करून त्यावर मंडप घालून ते लोक आपापल्या गाडीच्या खालीं शोकाकुल होऊन पडले ! जो तो म्हणाला, "काय हो आम्ही पाणी फेंकून दिलें आणि आतां पाण्यावांचून तळमळून मरण्याची आमच्यावर पाळी आली आहे."

पण बोधिसत्त्वाचा धीर मात्र खचला नाहीं. सकाळच्याच प्रहरीं त्यानें आसपासची जमीन तपासून पाहिली. जवळच्या एका लहानशा झुडपाखालीं त्याच्या पहाण्यांत दूर्वा आल्या. तेव्हां त्यानें असें अनुमान केलें कीं, खालीं असलेल्या पाण्याच्या झऱ्याच्या ओलाव्यानें त्या जिवंत राहिल्या असाव्या. तो आपल्या लोकांजवळ येऊन त्यांना म्हणाला, "गडे हो, आतां निजण्यांत अर्थ नाही. आपण जर हताश होऊन पडलों, तर आपणाला मरणोत्तरदेखील सद्‌गति मिळावयाची नाहीं. मृत्यु यावयाचाच असला तर तो प्रयत्नांनीं येऊं द्या. हताश होऊन मरणें हें शूराला शोभण्यासारखें कृत्य नाहीं. चला ! आमच्याजवळ जेवढ्या कुदळी, खोरी आणि पाट्या असतील तेवढ्या घेऊन आपण त्या पलीकडच्या झुडुपाजवळ खणून पाहूं, तेथें पाणी लागण्याचा संभव आहे."

त्या मनुष्यांनी त्या झुडुपाजवळ एक मंडप उभारला व त्याखाली खोदण्यास आरंभ केला. पुष्कळ खोल खड्डा खणण्यांत आला; तथापि पाण्याचा पत्ता लागेना; इतक्यांत एकाची कुदळ जाऊन दगडावर आदळली ! तेव्हां त्या साऱ्यांची पूर्ण निराशा झाली ! परंतु बोधिसत्त्व मात्र डगमगला नाहीं. तो त्या खड्डयांत खालीं उतरला आणि त्या खडकाला त्यानें कान लावून पाहिला. तो खडक इतका पातळ होता कीं, त्याच्या खालून वाहणाऱ्या झऱ्याचा आवाज स्पष्टपणें ऐकुं येत होता.

बोधिसत्त्व आपल्या स्वतःच्या नोकरास हांक मारून म्हणाला, "गड्या पहार घेऊन इकडे ये, आणि या दगडावर चार धक्के मार पाहूं कसे. आतां हातपाय गाळून बसण्याची वेळ नव्हे. ऊठ चल लवकर !"



नोकरानें भली मोठी पहार घेऊन त्या दगडावर जोरानें चार पांच प्रहार केले. तेव्हां तो दगड दुभंग होऊन खालच्या झऱ्यांत पडला. झऱ्याचा प्रवाह अडवला गेल्यामुळें पाण्याची धारा एकदम वर उडाली ! सगळया लोकांनी स्नान केलें व खाऊनपिऊन ते संतृप्त झाले. बोधिसत्त्वाच्या धीराची जो तो प्रशंसा करूं लागला. पाणी आहे असें दर्शविण्यासाठीं त्या ठिकाणी एक ध्वज उभारून ते लोक बोधिसत्त्वाबरोबर त्या कांतारांतून सुरक्षितपणें पार पडले.

* वाळूच्या कांतारीं यत्न करुनि लाभलें तयां पाणी ॥

साधु स्वयत्नें मिळावी शांतीची मानसीं तशी खाणी ॥१॥

* मूळ गाथा--

अकिलासुनो वण्णुपथे खणन्ता अदंगणे तत्थ पयं अविन्दुं ।

एवं मुनी विरियबलूपपन्नो अकिलासु विन्दे हदयस्स सान्तिं ॥

# लोभाचा परिणाम

(सेरिववाणिज जातक नं. ३)

तैलवाह नदीच्या कांठी आंध्रपूर नांवाचें नगर होतें. तेथें एक प्रख्यात श्रेष्ठी रहात असे. कालांतरानें ह्या श्रेष्ठीच्या घरावर अवदशेची फेरी आली. धनदौलत नष्ट झाली; आणि घरांतील सर्व पुरुषमंडळी मरून गेली, एक भोळसर बाई आणि तिची नात एवढींच काय ती दोन मनुष्यें ह्या श्रेष्ठीचें कुळांत शिल्लक राहिली होतीं. आपल्या वाड्याच्या मोडक्यातोडक्या भागांत राहून त्या दोघी बाया मोलमजूरीवर आपला निर्वाह करीत असत.

त्या काळीं आमचा बोधिसत्त्व एका वाण्याच्या कुळांत जन्मला होता. वयांत आल्यावर तो दुसऱ्या एका सेरिवा नांवाच्या फेरीवाल्या वाण्याबरोबर फेरीवाल्याचा धंदा करून आपला निर्वाह करीत असे. एकदां फिरत फिरत तें दोघे आंध्रपुराला आले. तेथें आपसामध्यें स्पर्धा होऊं नये म्हणून त्यांनी त्या शहरांतील गल्ल्या वांटून घेतल्या. ज्याच्या वांट्याला जे रस्ते आले असतील ते त्यानें फिरून संपविल्यावांचून दुसऱ्यानें त्या रस्त्यांत आपला माल विकण्यासाठीं फिरूं नये, असा त्यांनी निर्बंध केला. बोधिसत्त्वानें आपल्या वांट्याला आलेल्या रस्त्यांतून फेरी करून पांचशें * कार्षापणांची विक्री केली.

(* कार्षापण हे एकप्रकारचें नाणें असे. सुवर्ण कार्षापण, रौप्य कार्षापण व ताम्र कार्षापण असे त्याचे भेद असत. त्याच किंमती खात्रीनें सांगता येत नाहींत. तथापि अनुक्रमें ५ रुपये, १ रुपया व अर्धा आणा अशा असाव्या असा अंदाज करितां येतो. तेथें बोधिसत्त्वानें ५०० ताम्र कार्षापणाची विक्री केली असावी; व ह्या गोष्टींत पुढेंहि ताम्र कार्षापणच अभिमत असावा.)

सेरिवा आपल्या हिश्श्याला आलेल्या रस्त्यांतून फेरी करीत असतां वर सांगितलेल्या श्रेष्ठीच्या मोडक्या वाड्यावरून "मणी घ्या, मणी घ्या, नानातऱ्हेचे जिन्नस घ्या," असें मोठ्यानें ओरडत चालला होता. तें ऐकून त्या घरांत राहणारी मुलगी धावत जाऊन आपल्या आजीला म्हणाली, "आजीबाई आजीबाई, हा व्यापारी आमच्या घरावरून चालला आहे. त्याजकडून कांचेचे मणी किंवा दुसरा एकादा जिन्नस मजसाठीं विकत घे."

आजीबाई म्हणाली, "मुली, आम्हाला मिळणाऱ्या मोलमजूरीनें आमचा निर्वाहदेखील नीटपणें होत नाहीं. मग आम्हाला मणी वगैरे जिन्नस घेणें शक्य आहे काय ?"

मोडक्यातोडक्या सामानामध्यें एक भलें मोठें ताट पडलें होतें. तें त्या मुलीनें आपल्या आजीजवळ आणून ती म्हणाली, "आजीबाई ह्या ताटाचा आम्हाला मुळींच उपयोग होत नाहीं. मी आज किती दिवस पाहातें, हें ताट त्या मोडक्या सामानांत पडून राहिलें आहे. हें देऊन तो व्यापारी कांही जिन्नस देत असला तर आपण घेऊं."

आजीबाईनें सेरिवा वाण्याला बोलावून आणून एका आसनावर बसावयास सांगितलें, आणि ती त्याला म्हणाली "आर्य, आमच्या घरांत हें जुनें ताट पडून राहिलें आहे. याचा आम्हाला सध्यां कांही एक उपयोग होत नाहीं. जर ह्याच्या मोबदला माझ्या मुलीसाठीं एकादि मण्याची माळ द्याल, तर मी तें ताट तुम्हास देईन."

सेरिवा वाण्यानें तें ताट हातांत घेतलें. त्याच्या वजनावरूनच तें सोन्याचें असावें अशी त्याला शंका आली? आणि कसोटीला लावून पाहिल्यावर त्याची खात्री झाली. पण त्या बाईला कांहीं एक समजूं न देतां तो म्हणाला, "हें भिकार ताट येथें कशाला आणिलें ! ह्याची किंमत एक पै देखील होणार नाहीं. ह्याच्या मोबदला मण्याची माळ मला कशी देतां येईल ? तुम्हा बायकांना अक्कल कशी ती मुळींच नसते. उगाच मला त्रास दिलात."

असे उद्गार काढून आणि तें ताट तेथेंच जमिनीवर फेंकून देऊन सेरिवा त्या वाड्यांतून चालता झाला. वाटेंत तो आपणाशींच म्हणाला "त्या ताटाची खरी किंमत म्हटली म्हणजे एक लाख कार्षापण असली पाहिजे आणि माझ्या सगळ्या मालाची किंमत फार झाली तर तीन चार हजार कार्षापण असूं शकेल. तेव्हां माझा सर्व माल देऊन तें ताट मला मिळालें असतें तरीदेखील माझा पुष्कळच फायदा झाला असता परंतु ज्या अर्थी त्या बाईला त्या ताटाची किंमत माहीत नाहीं, त्या

अर्थी मण्याची एक माळ तरी कां खर्च करा ! संध्याकाळच्या वेळीं पुनः येऊन अर्धा कार्षापण किंमतीचे कांही मोडके तोडके कांचेचे मणी देऊन मला तें ताट सहज उपटतां येण्यासारखें आहे. आमच्या व्यापारी लोकांचें हेंच तत्व आहे कीं, जेथें अर्ध्या कार्षापणानें काम होत असेल, तेथें पाउण कार्षापण देखील खर्च करूं नये."

अशा विचारतरंगांत गर्क होऊन सेरिवा त्या गल्लींतून बाहेर पडला. बोधिसत्त्वाच्या हिश्श्याला आलेले सर्व रस्त्यांतून फेरी करून झाल्यावर; तो सेरिवा ज्या गल्ल्यांतून फेरी करून निघाला त्या गल्ल्यांत शिरला. अनुक्रमें तो त्या बाईंच्या वाड्याजवळ आला. तेव्हां तिची नात तिला म्हणाली, "आजीबाई, हा दुसरा एक वाणी ह्या रस्त्यानें जात आहे. त्याला तें ताट देऊन तो कांही देत असल्यास पाहूं."

आजीबाई म्हणाली, "मुली, त्या पहिल्या वाण्यानें आमची निर्भर्त्सना केली तेवढी पुरे नाहीं का झाली ? आता पुनः ह्याच्याकडून फजीती करून घ्यावयाची तुझी इच्छा आहे काय ?"

मुलगी म्हणाली, "आजीबाई, मुखचर्येवरून हा वाणी पूर्वीच्या वाण्यासारखा कर्कश दिसत नाहीं. आमच्या ताटाची किंमत कवडीची नसली, तरी तो आमच्याशीं सभ्यपणानें वागेल असें मला वाटतें."

आजीनें नातीच्या आग्रहास्तव बोधिसत्वाला हांक मारिली आणि ओसरीवर मांडलेल्या एका आसनावर बसावयास सांगितलें. तो खालीं बसल्यावर ती त्याला म्हणाली, "ह्या जुन्या ताटाची कांही तरी किंमत असावी असें मला वाटतें, कांकीं, आमच्या घरीं ज्या काळीं लक्ष्मी पाणी भरीत होती, त्या काळचें हें ताट आहे. पण तुमच्या पूर्वी येथें येऊन गेलेला व्यापारी गृहस्थ याची कांहींच किंमत नाहीं असें म्हणतो. तुम्हीं हें एकवार नीट तपासून पहा, आणि जर याची कांही किंमत होत असेल, तर ह्याच्या मोबदला माझ्या मुलीसाठीं एकादा मण्याचा अलंकार द्या."

बोधिसत्वानें तें ताट कसोटीला लावून पाहिलें, आणि तो त्या बाईला म्हणाला, "बाई, ह्या ताटाची किंमत एक लाख कार्षापण आहे, माझ्याजवळ अवघे पांचशें कार्षापण आहेत, आणि माझ्या मालाची किंमत फार झाली तर तीन साडेतीन हजार कार्षापण भरेल. तेव्हां ह्या ताटाच्या मोबदला देण्याजोगें मजपाशीं कांहीं नाहीं."

बोधिसत्वाचें सचोटीचें वर्तन पाहून त्या कुलीन स्त्रीला फार संतोष झाला. ती म्हणाली, "व्यापारी लोकांत तुझ्यासारखा प्रामाणिक माणुस विरळा. आम्हीं जर हें ताट बाजारांत विकावयास नेलें तर आमच्या ह्या दारिद्र्यावस्थेंत आमच्यावर चोरीचा आळ येण्याचा संभव आहे. तेव्हां तुला जें कांही देणें शक्य असेल तेवढें देऊन हें ताट घेऊन जा. तुझ्या प्रामाणिकपणाच्या वर्तनाबद्दल हें तुला बक्षीस आहे असें आम्हीं समजू."



बोधिसत्व म्हणाला, "माझ्याजवळ असलेला सर्व माल आणि रोकड रक्कम ह्या ताटाच्या मोबदला मी तुम्हाला देतों, मात्र मला ह्या रकमेपैकी आठ कार्षापण आणि मालापैकीं माझी तराजू मला द्या."

त्या बाईला हा सौदा पसंत पडला. बोधिसत्व तें ताट, आपली तराजू आणि आठ कार्षापण घेऊन नदीच्या काठीं आला, व ते कार्षापण देऊन त्यानें नावाड्याला विलंब न लावतां आपणाला परतीरीं पोंचविण्यास सांगितलें.

इकडे सेरिवा सर्व शहर हिंडल्यावर पुन्हां त्या कुलीन स्त्रीच्या घरी गेला व तिला म्हणाला, "बाई, तें ताट आण पाहूं. त्या ताटाची जरी कांहींच किंमत नाहीं, तथापि तुझ्यासारख्या थोर घरांण्यांतील बाईला वाईट वाटूं देणें मला योग्य वाटलें नाहीं, म्हणून पुनः येथवर येण्याची मीं तसदी घेतली."

बाई म्हणाली, "वा ! वा ! तू मोठा धूर्त दिसतोस ! जणूं काय आमच्यावर उपकार करण्यासाठींच येथें आला आहेस ! पण हें पहा ! त्या आमच्या ताटाची किंमत एक लाख होती, आणि त्याच्या मोबदला पांच-आठ कार्षापण किंमतीची एकादी मण्याची माळ देखील देणें तुला कठीण पडलें ! म्हणजे जवळ जवळ आमचें ताट तूं फुकटच घेऊं पहात होतास !! परंतु तुझ्या धन्याच्या योग्यतेचा दुसरा एक सज्जन वाणी येथें आला, आणि त्यानें त्या ताटाची खरी किंमत आम्हास सांगितली; व आपणाजवळ होता नव्हता तो सर्व माल आणि पैसा आम्हास देऊन तो तें ताट घेऊन गेला. तूं जर त्या वेळीं आम्हास एकादी मण्याची माळ दिली असतीस, तर ते ताट तुलाच मिळालें असतें ! पण अति शहाण्याचा बैल रिकामा !"

हें त्या बाईचें भाषण ऐकतांच सेरिवा पिसाळलेल्या कुतऱ्यासारखा उन्मत्त झाला. त्यानें आपला माल व पैसे त्या बाईच्या दरवाज्यांत इतस्ततः फेंकून दिले, व एक भलें मोठें दांडकें घेऊन तो नदीवर धांवला. बोधिसत्व नदीच्या मध्यभागी पोंचला होता त्याला पाहून सेरिवा अत्यंत संतप्त झाला, व 'नाव परत आणा, नाव मागें आणा' असें मोठमोठ्यानें ओराडूं लागला. कोणी कांही सांगितलें तरी नाव न फिरवतां आपणाला त्वरेनें परतीरी पोचविलें पाहिजे, असा बोधिसत्वानें अगाऊच करार केला होता तेव्हां नावाड्यांनीं सेरिवा वाण्याच्या ओरडण्याकडे लक्ष्य न देतां वेगानें नाव पुढें चालविली. सेरिवा ओरडून ओरडून थकला व घेरीं येऊन तेथेंच पडला !

* अतिलोभें धर्मनया मोहुनियां कष्ट फार भोगाल ॥

तो सेरिवा बुडाला, तेविं तुम्हीं शोक सागरी व्हाल ॥१॥

* मूळ गाथा --

इध चे चे हिनं निराधेसि सद्धम्मस्स नियामतं ।

चिरं त्वं अनुतपेस्ससि सेरिबायंऽव वाणिजो ॥

# अन्यायी अधिकारी.
## (तंडुलनालि जातक नं. ५)

वाराणसीमध्यें दुसरा एक ब्रह्मदत्त नांवाचा राजा राज्य करीत होता. त्या वेळीं आमचा बोधिसत्त्व लहान अधिकारावरून बढती, होत होत परदेशांतून येणाऱ्या मालाची किंमत ठरविणारा मुख्य अधिकारी झाला. बोधिसत्त्व मालाची यथायोग्य किंमत ठरवीत असे. पण ब्रह्मदत्ताला तें न आवडल्यामुळें तो बोधिसत्त्वाला एकांत स्थळीं बोलावून आणून म्हणाला 'मित्रा, तुला लहान अधिकारापासून मी ह्या मोठ्या अधिकारावर चढविलें आहे, तें कां हें तुला माहीत आहे काय ?"

बोधिसत्त्व म्हणाला, "महाराज, माझ्या प्रामाणिकपणाचें हें फळ आहे असें मी समजतों. आजपर्यंत ज्या ज्या लोकांशीं माझा संबंध आला त्यांना त्यांना कोणत्याही रीतीनें मजपासून ताप झाला नाहीं; एवढेंच नव्हे, सर्वत्र मी आपल्या प्रजेची यथाशक्ति सेवा केली आहे. माझ्या वरिष्ठ अधिकाऱ्यांविरुद्ध देखील दुर्बळांचा मी कैवार घेतला आहे. या माझ्या कामगिरीनें प्रसन्न होऊन श्रीमंतांनीं या अधिकारावर मला आणिलें अशी माझी समजूत आहे."

ब्रह्मदत्त म्हणाला, "तूं माझ्या प्रजेची सेवा केलीस हें ठीक आहे पण तुझा पगार माझ्या तिजोरींतून मिळत असल्यामुळें तूं माझ्या सेवेंत अंतर पडूं देतां कामा नये. कधी कधीं प्रजेचा आणि राजाचा अर्थ एकच असतो असें नाहीं; आणि राजसेवकांनी प्रथमतः आपल्या धन्याचा अर्थ साधून सवड झाल्यास इतरांचा साधावा हें योग्य आहे. आज मी तुला या ठिकाणीं बोलावून आणिलें त्याचें कारण हें कीं परदेशांहून येणाऱ्या मालाला खरीखुरी किंमत देऊन तूं जर माल खरेदी करूं लागलास तर माझी तिजोरी थोडक्याच मुदतींत रिकामी पडेल."

बोधिसत्त्व म्हणाला, "पण ह्या बाबतीत मला दुसरें कांही करितां येण्यासारखें आहे असें वाटत नाहीं. सत्य सर्वांत श्रेष्ठ आहे हें सुभाषित आपणाला माहीत आहेच. तेव्हां सत्याचा भंग होऊं

न देणें हें मनुष्याचें पहिलें कर्तव्य होय. पण समजा, परदेशांतून आलेल्या मालाची मी भलतीसलती किंमत ठरविली, तर देशोदेशीं आपल्या राज्यपद्धतीची अपकीर्ति होईल, आणि कोणताहि चांगला व्यापारी आपला माल घेऊन ह्या शहरांत येण्यास धजणार नाहीं. प्रामाणिकपणानें परमार्थच साधतो असें नाहीं, परंतु प्रपंचांत देखील प्रामाणिकपणासारखा दुसरा सुखावह मार्ग नाहीं." परंतु त्या लोभी राजाला बोधिसत्त्वाचा प्रामाणिकपणाचा मार्ग आवडला नाहीं. त्यानें त्याला त्या अधिकारावरून दूर केलें, आणि त्याच्या ऐवजीं आपल्या भोंवतीं जमलेल्या तोंडपुजे लोकांपैकीं एकाला त्या अधिकारावर नेमविलें. तो गृहस्थ राजाला आवडेल अशा रीतीनें परदेशांतून येणाऱ्या मालाची किंमत ठरवीत असे. तो राजाच्या मर्जीतील असल्याकारणानें त्याविरुद्ध कोणी तक्रार केली नाहीं.

कांही काळ गेल्यावर उत्तरेकडील देशांतून एक घोड्यांचा व्यापारी पांचशें उत्तम घोडे घेऊन विकण्यासाठी वाराणसीला आला. राजाच्या किंमत ठरविणाऱ्या नवीन अधिकाऱ्यानें त्या घोड्यांची किंमत * पावशेर तांदूळ ठरविली. त्याप्रमाणें राजानें त्या व्यापाऱ्याला पावशेर तांदूळ देऊन घोडे आपल्या पागेंत बांधण्यास हुकूम केला. गरीब बिचारा व्यापारी ते तांदूळ फडक्यांत बांधून आंसवें गाळीत तेथून चालता झाला.

(* मूळशब्द तंडुलनाळी असा आहे. नाळी म्हणजे सरासरी पावशेराचें मापटें असावें.)

वाटेंत बोधिसत्त्वाची आणि त्याची गांठ पडली. तेव्हां तो बोधिसत्त्वाला म्हणाला, "आजपर्यंत मीं असा कधींहीं नागवलों नाहीं. तुम्ही अधिकारावर असाल अशा समजुतीनें मीं पांचशें निवडक घोडे घेऊन विकावयास आलों. परंतु त्या राजाच्या आवडत्या मूर्ख अधिकाऱ्यानें त्या घोड्यांची अवघी पावशेर तांदूळ किंमत ठरविली ! म्हणजे दुसऱ्या अर्थी मला राजरोसपणें नागविलें म्हटलें पाहिजे !

बोधिसत्त्व म्हणाला, "आतां तूं तर नागविलेलाच दिसतोस तथापि मीं सांगतों ती एक युक्ति करून पहा. सुदैवानें तिला यश आल्यास तुला पावशेर तांदूळ घेऊन घरीं जाण्याचा प्रसंग येणार नाहीं. हा नवीन अधिकारी अत्यंत लोभी आहे असें मीं ऐकतों. राजाला जरी तो प्रिय आहे तरी लोकांकडून लांच खाऊन त्यांच्या मालाच्या दामदुप्पट किंमत ठरविण्यास तो मागें पुढें पहात नाहीं. त्याच्या कागाळया अद्यापि राजाच्या कानापर्यंत गेल्या नसल्यामुळें आणि लांगूलचालनामध्यें पटाईत असल्यामुळें तो अद्यापि त्या अधिकारावर टिकला आहे. तूं त्याजपाशीं जाऊन त्याला मोठें थोरलें अमिष दाखव पण तो म्हणेल कीं एकवार ठरवलेली किंमत पुनः ठरवितां यावयाची नाहीं. तेव्हां तूं त्याला ह्या पावशेर तांदुळाची किंमत ठरविण्यास सांग. मग तो काय करतो तें पाहूं."

बोधिसत्त्वाच्या सल्ल्याप्रमाणें तो व्यापारी त्या नव्या अधिकाऱ्यापाशीं गेला. आणि त्यानें त्याला मोठ्या बक्षिसाची लालूच दाखवून आपल्या पावशेर तांदुळाची किंमत ठरविण्यास सांगितलें. तेव्हां तो अधिकारी म्हणाला, "ह्या तांदुळाची किंमत राजेसाहेबांच्या हुकुमावांचून ठरवितां येत नाहीं. परंतु तुम्ही त्यांची परवानगी मिळविली असतां मी तुम्हांला खुष करून सोडीन."



तेव्हां तो व्यापारी राजाजवळ जाऊन राजाला म्हणाला, "महाराज, एवढे अमोलिक तांदूळ आमच्या देशांत मुळींच खपण्यासारखे नाहींत. या तांदुळाबद्दल पांचशें घोडे तर राहूंच द्या, परंतु एकादा मेंढा किंवा बकरादेखील कोणी देणार नाहीं. तेव्हां ह्या तांदुळाची विक्री मला येथेंच करणें भाग आहे आपण याची किंमत ठरवून मला आमच्या देशांत खपण्याजोगा दुसरा एकादा जिन्नस देण्याची मेहेरबानी करावी."

राजानें त्याची विनंति मान्य करून दुसऱ्या दिवशीं दरबारांत त्या तांदुळांची आपल्या नवीन अधिकाऱ्याकडून किंमत ठरविण्यांत यावी असा हुकूम केला. पांचशें घोड्यांची पावशेर तांदूळ किंमत ठरविण्यांत आली, व पुनः त्या पावशेरभर तांदुळाची उद्यां किंमत ठरविण्यांत येणार आहे, ही दरबारी बातमी शहरांत पसरण्यास उशीर लागला नाहीं.

दुसऱ्या दिवशीं नवा अधिकारी पावशेर तांदुळाची किंमत काय ठरवितो, हें पाहण्यासाठीं लोकांचे थव्यांचे थवे राजद्वारीं जमले. बोधिसत्त्वहि आपल्या कांहीं मित्रांसह तेथें आला होता.

दरबार भरल्यावर ते तांदुळाचें गाठोडें खाली ठेवून तो व्यापारी राजाला म्हणाला, "महाराज, आपल्या धान्याच्या कोष्ठागारांतून मिळालेले हे तांदूळ आहेत याची यथायोग्य किंमत ठरविण्याची मेहेरबानी व्हावी."

राजानें त्या नव्या अधिकाऱ्याला त्याची किंमत ठरविण्यास सांगितलें, तेव्हां तो तें गाठोडें हातांत घेऊन म्हणाला, "महाराज, हे तांदूळ पांचशें घोड्याच्या किंमतीदाखल ह्या व्यापाऱ्याला देण्यांत आले आहेत, तरी या तांदुळाची किंमत आसपासच्या गांवासह ही वाराणसी नगरी होणार आहे !"

पावशेर तांदुळाची ठरवलेली ही किंमत पाहून जमलेल्या लोकसमूहांत एकच हंशा पिकला ! कित्येकजण टाळया पिटून "आमच्या राजाला योग्य अधिकारी सापडला" असें मोठमोठ्यानें ओरडूं लागले. दुसरे कित्येकजण म्हणाले, "आम्हीं आमची राजधानी अमोलिक समजत होतों. परंतु तिची किंमत पावशेर तांदुळापेक्षां जास्त नाहीं हें आम्हाला आजच समजलें. वाहवा किंमत ठरविणारा !"

राजाला अतिशय लाज वाटली. त्यानें तेथल्यातेथें त्या तोंडपुज्या लोभी अधिकाऱ्याला अधिकारावरून दूर करून पुनः तो अधिकार बोधिसत्त्वाला दिला, व बोधिसत्त्वानें ठरविलेली घोड्यांची योग्य किंमत त्या व्यापाऱ्याला देऊन त्याचें समाधान केलें.

# सुखी संन्याशी.

## (सुखविहारी जातक नं. १०)

एका कालीं बोधिसत्त्व औदिच्य ब्राह्मण कुलामध्यें जन्मला होता. तो वयांत आल्यावर गृहस्थाश्रमाला कंटाळून परिव्राजक झाला, व हिमालयपर्वतावर राहूं लागला. त्याच्याजवळ तेथें बरीच शिष्यशाखा जमली. एका वर्षाऋतूत तो फिरत फिरत काशीला आला, व तेथील राजाच्या उद्यानांत त्यानें राजाच्या आग्रहास्तव पावसाळयाचें चार महिने घालविले. पावसाळा संपल्यावर तो आपल्या शिष्यांसह पुनः हिमालयावर जाण्यास सिद्ध झाला.

तेव्हां राजा त्याला म्हणाला, "आतां तुम्ही वृद्ध झाला आहां. हिमालय पर्वताच्या टेकड्यांवरून चढण्या उतरण्यास तुम्हांस अतिशय क्लेश होतील. तेव्हां तुम्हीं येथेंच रहा व आपल्या शिष्यांना हिमालयावरील आश्रमांत पाठवा."

बोधिसत्त्वाला राजाचें म्हणणें पसंत पडलें, आणि आपल्या एका प्रमुख शिष्याबरोबर सर्व परिव्राजकांना हिमालयावरील आश्रमांत पाठवून तो एकटाच त्या उद्यानांत राहूं लागला. काशीच्या राजानें त्याची व्यवस्था चांगली ठेविली.

बोधिसत्त्वाचा तो जेष्ठ शिष्य कांही काल सर्व परिव्राजकांसह हिमालयावरील आश्रमांत राहिल्यावर आपल्या अतीथ्यांना म्हणाला "गुरूला पाहून पुष्कळ दिवस झाले. आतां मी एकटाच जाऊन त्यांचा समाचार घेऊन येतों. तोंपर्यंत तुम्ही एकमतानें वागून आपल्या तपश्चर्येची अभिवृद्धि करा."

तो अनुक्रमें काशीला येऊन आपल्या गुरूला भेटला, व संध्याकाळच्या वेळीं आश्रमाच्या ओसरीवर चटई टाकून विश्रांतीसाठीं पडून राहिला. इतक्यांत काशिराजा बोधिसत्त्वाच्या दर्शनाला तेथें आला. तो आश्रमांत जात असतां त्याला पाहून हा आगंतुक तापस उठला तर नाहींच पण "अहो सुखं, अहो सुखम्" असें उद्गारला. राजाला या यःकश्चित तापसानें आपला योग्य मान न

ठेविल्याबद्दल फार वाईट वाटलें. पण बोधिसत्त्वाच्या मर्यादेस्तव आपला राग आवरून तो आश्रमांत शिरला आणि बोधिसत्त्वाला नमस्कार करून एक बाजूस बसला व म्हणाला,

"भदंत, आज आपल्या आश्रमांत एक आगंतुक तापस आला आहे असें वाटतें. पण तो खरा तापस नसावा अशी माझी समजूत झाली आहे. हा मनुष्य मीं आश्रमापाशीं पोहोंचलों तरी न उठतां खुशाल चटईवर लोळत होता, व मी जवळ आल्यावर 'अहो सुखं, अहो सुखम्' असें ओरडला. मला वाटतें तो फार आळशी असल्यामुळें आकंठ जेवून निजला असावा, व त्यांतच त्याला स्वर्गसुख वाटत असावें."



बोधिसत्त्व म्हणाला, "महाराज, आपली गैरसमजूत झाली आहे. हा तापस यथेच्छ खाऊन अजगरासारखा इतस्तः लोळण्यांत सुख मानणारा मनुष्य नव्हे. पूर्वी तो आपल्यासारखा उत्तरेकडील एका प्रदेशाचा राजा होता. तें राज्य आपल्या तरुण मुलांच्या स्वाधीन करून तो माझा अनुयायी झाला. हिमालयावर जे माझे शिष्य आहेत त्यांत हाच प्रमुख होय. आजच तो येथें येऊन पोहोंचला. मार्गांत फार श्रम झाल्यामुळें विश्रांतीसाठी तो जरा ओसरीवर पडला आहे. आतां त्यानें जे उद्‌गार काढिले त्याचें कारण आपल्या लक्षांत आलें नाहीं.

जेव्हां तो आपल्या राजवाड्यांत रहात होता तेव्हां आपल्याप्रमाणेंच त्याचे शिपाई त्याचें रक्षण करीत असत आणि तो आपल्या जिवाला धोका न पोहोंचावा म्हणून दुसऱ्या लोकांवर सक्त नजर ठेवीत असे. हांजी हांजी करणाऱ्या आणि लांगूलचालन करणाऱ्या लबाड धूर्त लोकांनी त्याला घेरलें होतें. आपल्या अंतःपुरांतील स्त्रियांवरदेखील विश्वास ठेवणें त्याला इष्ट वाटत नसे. अशा स्थितींत राजसंपत्ति त्याला विषमय वाटली असल्यास नवल नाहीं. अर्थात् राजवाड्यांतील सुखाला कंटाळून त्यानें त्या बंधनागाराचा त्याग केला; आणि तो हिमालयावर माझ्या आश्रमांत येऊन राहिला. आतां जेव्हां त्यानें आपणाला पाहिलें, तेव्हां आपण अशा राज संपत्तिरूप विपत्तींतून पार पडलों, याची

त्याला पुनः एकवार आठवण झाली असावी, व त्यानें "अहो सुखं, अहो सुखम्" हे उद्गार काढिले असावे.

राजाला बोधिसत्त्वाचें भाषण ऐकून फार आश्चर्य वाटलें; व आपण तापसाविषयीं भलतीच कल्पना केली याबद्दल तो खजील झाला. बाहेर जाऊन त्यानें त्या तापसाला वंदन केलें; आणि त्याला त्याचें वृत्त विचारलें. तापसानें आपण राजवाड्यांतील सुखांना कसे कंटाळत गेलों; पण त्यांची संवय झाल्यामुळें त्यांचा पुढे हिमालय पर्वतावरील आपल्या गुरूच्या मोकळया आश्रमांत राहूं लागल्यापासून आपणाला किती सुख वाटलें इत्यादि सर्व वृत्तांत राजाला सांगितला; आणि तो म्हणाला, "महाराज, आज जेव्हां मी हा तुमचा मोठा लवाजमा पाहिला तेव्हां माझ्या राजवाड्यांतील विपत्तीची मला आठवण झाली, व सहजासहजीं 'अहो सुखं, अहो सुखम्' हे उद्गार माझ्या तोंडांतून निघाले."

राजा म्हणाला, "भो तापस, आपण मला क्षमा करा. मी राज्यसुखांत दंग झाल्यामुळें आपल्यासारख्या सत्पुरुषांची मला पारख करितां येत नाहीं. ज्यानें त्यानें मला मान द्यावा असें मला वाटतें, व जर कांहीं एखाद्या माणसाकडून स्वतंत्रतेचें वर्तन घडलें तर त्याचा मला ताबडतोब तिटकारा येतो. मघाशीं आपण मला पाहून उठलां नाहीं याबद्दल मला राग आला; आणि त्यामुळें आपल्या उद्गारांचा मी भलताच अर्थ केला. आपल्या उदारचरिताचा यापुढें माझ्या आचरणावर इष्ट परिणाम होईल अशी मला आशा आहे."

तापसानें राजाला धर्मन्यायानें राज्य चालविण्याविषयीं उपदेश केला. तेव्हां राजा त्याला वंदन करून निघून गेला.

अगदी याच अर्थाचा एक तुकाराम महाराजांचा अभंग आहे.

एक तटस्थ मानसीं । एक सहजची आळशी ॥१॥
दोन्ही दिसती सारखीं । वर्म जाणें तो पारखी ॥२॥
एक ध्यानीं करिती जप । एक बैसुनि घेती झोंप ॥३॥
एका सर्वस्वाचा त्याग । एका पोटासाठीं जग ॥४॥
एका भक्ति पोटासाठीं । एका देवासाठीं गांठीं ॥५॥
वर्म पोटीं एका । फळें दोन म्हणे तुका ॥६॥

(तुकाराम)

# उदारधी मृग.
## (निग्रोधमिग जातक नं.१२)

एका काळीं आमचा बोधिसत्त्व मृगकुलांत जन्मला होता. त्याची कांति सुवर्णासारखी होती; डोळे वज्रमण्यासारखे तेजस्वी होते; शिंगें रजत वर्णाची होतीं; तोंड अरुणवर्ण, आणि हातपाय लाक्षारसानें चित्रित केल्यासारखे सुंदर होते. त्याची वालधि चमरमृगाच्या वालधीसारखी शोभिवंत होती, व शरीर जवान घोड्यासारखें सुंदर दिसत होतें. तो आपल्या पांचशें मृगांच्या परिवारासह अरण्यामध्यें राहत होता. त्याला त्याचे लोक न्यग्रोधमृगराज या नांवानें ओळखत असत. त्याच अरण्यामध्यें बोधिसत्त्वाच्या जातीचा दुसरा एक शाख नांवाचा मृग आपल्या मृगगणासह रहात असे.

त्या काळीं काशीच्या राजाला मृगयेची फारच चट लागली होती. तो दररोज शिकारीला जातांना मृगांना वेढण्यासाठीं आपल्या शेतकरी लोकांना घेऊन जात असे. त्यामुळें लोकांची फार हानी होई. शेतांतील कामें अर्धवट रहात असत, व वेळेवर शेताची पेरणी वगैरे न झाल्यामुळे शेतकऱ्यांचे नुकसान होत असे. तेव्हां वाराणसीच्या आसपास राहाणाऱ्या लोकांनीं असा विचार केला कीं, "भलत्याच वेळीं शिकारीला जावें लागल्यामुळें आमची कामें तशींच रहातात, त्यापेक्षां आपण एक मोठें कुरण तयार करून व त्याच्या भोंवतीं एक बळकट कुंपण घालून अरण्यांतून पुष्कळ मृगांना त्या कुंपणांत आणून सोडूं. म्हणजे रोज राजा एखाद्या दुसऱ्या मृगाची शिकार करून मांस खाईल, व आम्हाला शिकारीला नेणार नाहीं."

त्याप्रमाणें त्या लोकांनी एक मोठें कुंपण तयार केलें, आणि मृगांना पाणी पिण्यासाठीं तेथें एक लहानसा तलाव खोदला. पावसाळ्यानंतर जेव्हां त्या कुंपणांत गवत वाढलें तेव्हां नागरवासी आणि ग्रामवासी सर्व लोक आपापलीं शस्त्रास्त्रें घेऊन मृगांना आणण्यासाठी आरण्यांत शिरले. तेथें

त्यांनी न्यग्रोध मृगाच्या आणि शाखमृगाच्या स्थानाला वेढा दिला, आणि दांडक्यांनी झाडें झुडपें बडवून व मोठ्यानें आरडाओरड करून त्या मृगांना तेथून हुसकावून लावलें. परंतु मृगांना पळून जाण्याला दुसरी वाट न ठेवल्यामुळें त्यांना वाराणसीच्या राजासाठीं नवीन कुंपणांत शिरल्याशिवाय दुसरें गत्यंतर राहिलें नाहीं. ते सगळे मृग त्या कुंपणांत शिरल्यावर रयत लोकांनी त्या कुंपणाचे फाटक लावून टाकिलें, व राजवाड्यांत जाऊन ते राजाला म्हणाले, "महाराज, आपण आम्हाला घेऊन रोज शिकारीला जात असल्यामुळें आमचें फार नुकसान होत आहे. म्हणून आम्हीं हजारएक मृगांना नवीन कुंपणांत आणून सोडलें आहे. आतां रोज आपणाला जे एक दोन मृग मारावयाचे असतील ते मारून त्यांचें मांस खात जा. पण आम्हांला मात्र शिकारीला जाण्याचा हुकूम करूं नका."

राजाला लोकांचे म्हणणें योग्य वाटलें, व शिकारीला जाण्याबद्दल त्यांच्यावर त्या दिवसापासून सक्ती करण्यात येणार नाहीं असें अभिवादन देऊन त्यानें त्या लोकांना आपापल्या घरीं पाठविलें; आणि तो आपल्या मुख्य स्वयंपाक्यासह त्या कुंपणांत गेला. तेथें न्यग्रोध आणि शाख ह्या दोन मृगांना पाहून तो अत्यंत संतुष्ट झाला, व त्या दोघांना त्यानें अभयदान दिलें. त्या दिवसापासून राजा स्वतः एखाद्या मृगाला मारून घेऊन येत असे किंवा त्याचा मुख्य स्वयंपाकी मृगाला मारून आणीत असे.

परंतु मृग राजाला किंवा त्या सूदाला पाहून इतस्ततः पळत सुटत, व एक मृग मरेपर्यंत चार पांच मृगांना बाण लागून ते घायाळ होत असत; आणि कधीं कधीं त्या जखमांमुळें मरण पावत असत. बोधिसत्त्वाच्या अनुयायी मृगांनीं ही गोष्ट बोधिसत्त्वाला कळविली, तेव्हां शाखाला बोलावून तो त्याला म्हणाला, "मित्रा, एकासाठीं पुष्कळ मृगांचा नाश होत आहे. दररोज एकाचें मरण तर चुकावयाचें नाहींच, पण एवढ्यासाठीं इतरांचा नाश होऊं न देणें आम्हांस शक्य आहे. आम्हीं राजाला अशी विनंती करून कीं, आजपासून बाणानें मृगाला मारण्यांत येऊं नये. एक जागा तयार करून तेथें एक लांकडाचा ओंडा ठेवण्यांत यावा, व रोज एका मृगानें जाऊन त्या ओंड्यावर आपलें डोकें ठेवून तेथें पडून रहावें; आणि राजानें किंवा राजाच्या सूदानें त्याचे डोकें कापून त्याला तेथून घेऊन जावें."

ही गोष्ट शाखमृगाला पसंत पडली. तेव्हां बोधिसत्त्व त्याला म्हणाला, "माझा आणि तुझा परिवार सारखाच आहे. अर्थात् एक दिवस माझ्या गणावर पाळी असावी, व एक दिवस तुझ्या गणावर असावी."

ह्याहि गोष्टीला शाखमृग कबूल झाला; व त्या दिवसापासून आळीपाळीनें एक मृग निश्चित ठिकाणीं पाठविण्याचें ठरलें. दुसऱ्या दिवशीं राजा मृगाला मारण्याकरितां तेथें आला असतां अभयदान मिळालेले हे दोघे मृग पुढें सरसावून राजाला म्हणाले, "महाराज, आपणाला रोज एकाच मृगाचें मांस लागतें, पण त्याच्यासाठीं आमच्या गणांतील पुष्कळ मृग नाश पावतात. एवढ्यासाठीं आजपासून आमच्यावर मेहेरबानी करून आपण एक स्थान निश्चित करा. आमच्यापैकी रोज एक मृग त्या ठिकाणी जाऊन तेथें ठेवलेल्या ओंड्यावर आपलें डोकें ठेवून पडून राहील. त्याला आपण एका घावानें ठार मारून तेथून घेऊन जावें. म्हणजे आजकाल बाणाच्या प्रहारानें जे पुष्कळ मृग घायाळ होतात, ते व्हावयाचे नाहींत; व आपणाला मृगामागें चहूंकडे धांवण्याचेहि श्रम पडावयाचे नाहींत."

राजानें त्या मृगांची विनंति मान्य करून त्यांच्या सांगण्याप्रमाणें एक स्थान तयार केलें; व त्या दिवसापासून त्या ठिकाणीं ठेवलेल्या ओंड्यावर डोकें ठेवून निजलेल्या मृगालाच मारून आणावें असा त्यानें आपल्या स्वयंपाक्याला हुकूम केला. कांहीं काळपर्यंत ही व्यवस्था सुरळीत चालली होती.जा

एके दिवशीं शाखमृगाच्या अनुयायांपैकी एका गर्भिणी मृगीवर त्या ठिकाणीं जाण्याची पाळी आली. तेव्हां ही शाखाला म्हणाली "महाराज, आजची माझी पाळी दुसऱ्या कोणत्या तरी मृगाला द्या. मी सांप्रत गार्भिणी आहे; आणि प्रसूत झाल्यावर माझें लेकरूं व मी अशीं दोघेंहि पाळीवर जाऊं."

शाख म्हणाला. "बाई असें करण्याचा मला अधिकार पोंचत नाहीं. ज्याच्यावर पाळी आली असेल त्यानेंच त्या ठिकाणीं गेलें पाहिजे. मी जर अन्यायानें वागूं लागलों तर आमच्या समाजांत मोठी अव्यवस्था होईल. तेव्हां मला तुझ्या विनंतीला मान देतां येत नाहीं."

ती मृगी मोठ्या कष्टी अंतःकरणानें न्यग्रोधमृगाजवळ गेली, व त्याला म्हणाली, "महाराज, मी शाखमृगाच्या परिवारापैकीं एक गर्भिणी मृगी आहे. आज राजाच्या अन्नासाठीं देह अर्पण करण्याची माझ्यावर पाळी आली आहे. पाळी दुसऱ्याला देऊन सध्यां मला मोकळें करावें, अशी मी

आमच्या पुढाऱ्याला विनंति केली; परंतु त्यानें ती फेंटाळून लाविली. आता जर आपल्या मंडळीपैकी माझ्याऐवजीं एकादा मृग पाठविण्याची मेहेनबानी कराल तर पुढें प्रसूत झाल्यावर तुमच्या समाजावर पाळी येईल त्यावेळीं मी व माझें लेकरूं त्या पाळीचा आनंदानें स्वीकार करूं."

बोधिसत्त्व म्हणाला, "बाई, तूं कांहीं काळजी करूं नको. मी तुझ्या पाळीची व्यवस्था करतों. तूं चारा खाऊन आणि पाणी पिऊन आनंदानें रहा."

त्या दिवशीं राजाचा स्वयंपाकी त्या ठिकाणी येऊन पाहतो, तों अभयदान मिळालेला न्यग्रोधमृगच त्या ओंड्यावर डोकें ठेवून पडला होता. तें आश्चर्य पाहून तो तसाच धांवत राजापाशीं गेला आणि म्हणाला, "महाराज, आज मी मृगाला मारून आणण्यासाठीं रोजच्या ठिकाणी गेलों होतों. तेथें आपण अभयदान दिलेल्या दोन नायक मृगांपैकीं एक जण त्या ओंड्यावर डोकें ठेवून पडलेला आहे ! परंतु आपल्या हुकूमावांचून त्याला मला कसा हात लावतां येईल ? म्हणून मी तसाच धांवत येथें आलों आहे, आतां आपला हुकूम होईल त्याप्रमाणें करण्यांत येईल."

राजा त्या स्वयंपाक्याबरोबर स्वतः त्या ठिकाणीं गेला, आणि ओंड्यावर डोकें ठेऊन निजलेल्या न्यग्रोधमृगाला म्हणाला, "मित्रा, मृगराजा, तुला मी अभयदान दिलें असतां तूं या ठिकाणी येऊन कां निजलास ?"



"महाराज, मी मृगसंघाचा नायक असल्यामुळें माझ्यावर पाळी येण्याचा संभव नाहीं. परंतु शाखाच्या परिवारापैकी एका गार्भिणी मृगीवर पाळी आली होती. तिनें ती दुसऱ्या मृगाला देण्याची मला विनंती केली. परंतु एकाचें मरण मी दुसऱ्याला कसे द्यावें ? तेव्हां तिची पाळी माझ्यावर घेऊन मी येथें पडलों आहे. मला मारिलें असतां आपल्या वचनाचा भंग होईल अशी शंका धरूं नका. कां कीं मीं मजसाठीं मरत नसून गार्भिणी मृगीसाठीं मरण्यास सिद्ध झालों आहें."

राजा म्हणाला, "मी त्या गर्भिणी मृगीलाहि अभय देतों. तूं आतां या ओंड्यावरून ऊठ."

"पण महाराज, इतर मृगांची वाट काय ? गर्भिणी मृगीची पाळी मी घेतली व त्यामुळें तिला अभयदान मिळालें, ही बातमी मृगसंघाला लागल्याबरोबर प्रत्येक मृग आपली पाळी चुकविण्यासाठीं मला विनंती करील; व त्या योगें मला वारंवार येथें येऊन आपणाला तसदी द्यावी लागेल ! त्यापेक्षां आपण आजच मला मारावें हें बरें !"

राजा म्हणाला, "असें असेल तर मी सर्व मृगांना अभय देतों."

बोधिसत्त्व म्हणाला, "महाराज या उद्यानांतील मृगानांच आपण अभय देतां. पण अरण्यांतील इतर श्वापदांनी काय करावें ? त्यांची गति काय होणार ?"

राजानें सर्व प्राण्यांना अभयदान देण्याचें अभिवचन दिल्यावर बोधिसत्त्व त्या ओंडावरून उठला, आणि त्यानें राजाला शील राखण्यासाठीं व धर्मानें राज्य करण्यासाठीं उपदेश केला. नंतर राजानें त्या सर्व मृगांना कुरणांतून मोकळें केलें. व ते अरण्यांत आपल्या मूळच्या ठिकाणीं गेले.

तेथें त्या गर्भिणी मृगीला एक सुंदर पुत्र झाला तो लहानपणी वारंवार शाखमृगाजवळ जात असे. आईला जेव्हां ही गोष्ट समजली तेव्हा ती त्याला म्हणाली, "बाबारे, + तुला तुझें कल्याण व्हावें अशी इच्छा असेल तर शाखमृगाचा सहवास न करितां न्यग्रोधाची संगति धर. न्यग्रोधाबरोबर मरणें श्रेयस्कर आहे; पण शाखाबरोबर जगणें श्रेयस्कर नाहीं."

+ मूळ गाथा--

निग्रोधमेव सेवेय्य न साखं उपसंवसे ।

निग्रोधस्मिं मतं सेय्यो यंचे साखस्मिं जीवितं ॥

# जिभेचें बंधन.
## (वातमिग जातक नं. १४)

आमचा बोधिसत्त्व एकदां वाराणसीच्या राजाच्या पट्टराणीच्या पोटी जन्माला आला आणि बापाच्या मरणानंतर वाराणसीचा राजा झाला. त्याचा संजय नांवाचा एक हुषार माळी (उद्यानपाल) होता. एके दिवशीं राजा त्याला म्हणाला, "संजया, तुझ्या उद्यानामध्यें एकादी आश्चर्यकारक गोष्ट दाखवूं शकशील काय ?"

"जर मला लागेल तेवढा मध देण्याचा हुकूम होईल तर मी महाराजांना थोडक्याच दिवसांत एक अपूर्व आश्चर्य दाखवीन."

राजानें आपल्या कोठारांतून संजयाला लागेल तेवढा मध देण्याची आज्ञा केली.

त्या उद्यानामध्यें रोज एक वातमृग येत असे; पण--वातमृगच तो--संजयाचें वारें पडल्याबरोबर बाणासारखा पळत सुटे. संजयानें राजाच्या कोठारांतून मध आणून तो उद्यानांतील गवताला सारविला. हळूंहळूं वातमृगाला त्या गवताची इतकी गोडी लागली कीं, तो संजयाच्या जवळ जाऊन देखील तें गवत खाऊं लागला. कांहीं दिवस लोटल्यावर संजय राजाला म्हणाला, "महाराज, आज तुम्हाला मी उद्यानांतील आश्चर्य दाखविणार आहें. दुपारीं तें पहाण्यासाठीं आपण राजवाड्यांतच रहावें."

नंतर संजय उद्यानांत गेला; आणि वातमृग तेथें आल्यावर त्यानें त्यासमोर मध फांसलेले गवत टाकिलें. ते खाल्यावर राजवाड्याच्या बाजूला कांहीं अंतरावर आणखी गवत टाकिलें. याप्रमाणें हळुहळू त्या मृगाला संजयानें राजवाड्यांत आणून बाहेरचा दरवाजा बंद केला व तो राजाला म्हणाला, "महाराज, वातमृग मनुष्याच्या छायेलादेखील उभा रहात नाहीं, हें आपण जाणतच आहां. असें असतां त्याला मी येथपर्यंत आणून सोडलें हें अपूर्व आश्चर्य नव्हे काय ?"

राजा म्हणाला, "वातमृग मनुष्याच्या वाऱ्याला उभा रहात नाहीं ही गोष्ट खरी आहे. परंतु रसतृष्णा मोठी बळकट आहे. आपल्या जिभेला जर हा वातमृग वश झाला नसता तर तो तुझ्या ताब्यांत कधींहि आला नसता. पण जिभेच्या मागें लागल्यामुळें तूं नेशील तिकडे त्याला जाणें भाग पडलें ! जिभेचें बंधन बळकट खरें !!"



# नियमितपणाचा आणि अनियमितपणाचा परिणाम. १

(खारादिय जातक आणि तिपल्लत्थमिग जातक नं. १५, १६)

एके काली बोधिसत्त्व मृगकुलामध्यें जन्माला होता तो मृगमायेंत अत्यंत निपुण होता. त्याच्या दोन बहिणींनीं आपल्या दोन तरुण मुलांना मृगविद्या शिकण्यासाठीं त्याच्या स्वाधीन केलें. पण त्यांपैकीं खारादिया नांवाच्या बहिणीचा मुलगा सात दिवसपर्यंत रोज बोधिसत्त्वानें बोलावल्या वेळीं त्याजपाशीं आला नाहीं. पण दुसऱ्या बहिणीचा मुलगा तिपल्लत्थ हा मामानें नेमून दिलेल्या वेळीं येऊन विद्या शिकत असे.

खारादियेचा मुलगा शिकण्याची वेळ चुकवून अरण्यांत भटकत फिरे. एके दिवशीं एका पारध्यानें लावलेल्या जाळयांत तो सांपडला व मोठ्यानें आरडाओरडा करूं लागला. आईला ही गोष्ट समजलीं तेव्हां ती धांवत धांवत आपल्या भावाजवळ आली आणी म्हणाली, "दादा, चार उपदेशाच्या गोष्टी सांगून माझ्या मुलाची कशी तरी सुटका करा."

बोधिसत्त्व म्हणाला, "खारादिये, तुझ्या मुलाला मीं सातदां वेळेवर येण्यासाठीं बजावून सांगितलें असतां तो मजपाशीं आला नाहीं. त्याला खैर फिरण्याची खोटी संवय लागल्यामुळें मला त्याचें हित करतां आलें नाहीं व आतां तो पाशांत सांपडल्यावर तेथें जाण्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्याला तर पारधी मारणारच. पण त्याजवळ जाऊन माझ्या जिवाला मात्र मी धोक्यांत घातल्यासारखें होईल."

खारादिया रडत रडत आपल्या मुलाच्या समाचाराला गेली. पण ती जवळ पोहोंचण्यापूर्वीच पारध्यानें त्याला मारून तेथून उचलून नेलें होतें !

कांही काल लोटल्यावर तिपल्लत्थ जाळयात सांपडला. तेव्हां त्याची आई बोधिसत्त्वाला म्हणाली, "माझ्या मुलाला मी तुझ्या जवळ ठेविलें असतां त्याची ही काय वाट झाली ?"

बोधिसत्त्व म्हणाला, "तूं मुळींच घाबरूं नकोस. तुझा मुलगा नियमितपणानें विद्या शिकला आहे. तो शंभर पाशांतूनदेखील मुक्त होऊन येईल. मग ह्या यःकश्चित् पाशाची काय कथा !"

इकडे तो पारधी तेथें येण्यापूर्वी तिपल्लत्थानें आपलें पोट फुगवून, डोळे वटारून आणि हातपाय ताणून मेल्याचें सोंग घेतलें. पारधी तेथें येऊन त्याच्या पोटावर दोनचार टिचक्या मारून व त्याच्या तोंडावाटे निघालेला फेंस पाहून आपणाशींच म्हणाला, "ह्याला जाळयांत सांपडून फार वेळ झाला असावा. आतां याचें मांस तयार करण्याला उशीर लागला तर तें बिघडून जाण्याचा संभव आहे. तेव्हां येथेंच मांस कापून टोपलींत भरून घेऊन जावें हें बरें."



असें बोलून त्यानें तिपल्लत्थाचे पाश मोकळे केले, व तो आपली सुरी साफ करूं लागला. इतक्यांत तिपल्लत्थ उठून उभा राहिला आणि वातवेगानें पळून जाऊन आपल्या आईला भेटला !

# खरें कारण समजलें म्हणजे भांडण मिटतें.

(मालुत जातक नं. १७)

एकदां बोधिसत्त्व तपस्वी होऊन एका टेंकडीच्या पायथ्याशीं रहात होता. त्या वेळीं त्या पर्वताच्या एका गुहेंत एक सिंह आणि एक वाघ परस्परांशीं स्नेहभावानें वागून वास करीत असत. पण एके दिवशीं थंडीसंबंधानें त्यांचे भांडण जुंपलें. वाघाचें म्हणजें 'थंडी कृष्णपक्षांत वाढत असते' असें होतें. सिंह 'थंडी शुक्लपक्षांतच वाढते' असें म्हणे. त्या दोघांचेंहि भांडण विकोपास जाण्याच्या बेतांत आलें. तेव्हां ते दोघे बोधिसत्त्वाजवळ जाऊन त्याला म्हणाले "भो तापस, आमच्या ह्या भांडणाचा निकाल कर."

बोधिसत्त्व त्याचें भांडण कशा संबंधानें होतें हें समजावून घेऊन म्हणाला "कृष्णपक्ष असो किंवा शुक्लपक्ष असो, ज्या वेळीं वारा वाहत असतो त्या वेळी थंडी वाढत असते. कां कीं थंड वारा हेंच थंडीची अधिक बाधा होण्याचें कारण होय. तेव्हां कांहीं अंशी आपणां दोघांचें म्हणणें खोटें नाहीं. ह्या भांडणांत कोणाचाहि पराजय झाला नाहीं असें मी समजतों."

बोधिसत्त्वाच्या उपदेशानें त्या दोघांनी तुटूं पाहणारी मनें पुनः मिलाफ पावलीं.

ज्या गोष्टीसंबंधानें वाद होतो तिचें खरें कारण समजलें असतां किती तरी भांडणें मिटतील !

## प्राण्याचा वध करून श्राद्ध करणें इष्ट आहे काय !
(मतकभत्त जातक नं. १८)

वाराणशीमध्यें एकदां एक वेदशास्त्रसंपन्न प्रख्यात ब्राह्मण रहात होता. त्याच्याजवळ वेदाध्ययन करण्यासाठीं पुष्कळ शिष्य रहात असत. वडिलांच्या श्राद्धाच्या दिवशीं आपण बाळगलेल्या एका मेंढ्याला आपल्या शिष्यांच्या स्वाधीन करून तो म्हणाला, "मुलांनों, ह्या मेंढ्याला नदीवर नेऊन स्नान घालून पंचांगुलिक * देऊन सजवून आणा. आज याला मारून मी पितरांचें श्राद्ध करणार आहें."

(* रक्तचंदनांत हात भिजवून पांची बोटें उमटतील अशा रीतीनें जनावरांच्या पाठीवर मारणें ह्याला "पंचांगुलिक" म्हणत असत.)

शिष्यांनीं त्या मेंढ्याला नदीवर नेऊन स्नान वगैरे घालून तांबड्या फुलांच्या मालांनीं सजवून आणि पंचांगुलिक देऊन नदीच्या कांठीं उभें केलें. तेव्हां तो मोठ्यानें हंसला; व नंतर मोठ्यानें रडला. तें पाहून त्या तरुणांना फार आश्चर्य वाटलें. ते म्हणाले, तूं पहिल्यानें हंसलास व नंतर रडलास याचें कारण काय ?

मेंढा म्हणाला, "हा प्रश्न तुम्हीं आचार्यासमोर विचारा; म्हणजे मी तुम्हांला याचें उत्तर देईन."

शिष्यांनीं त्या मेंढ्याला आपल्या आचार्याजवळ नेऊन नदीवर घडलेली सर्व गोष्ट त्याला कळविली. तेव्हां तो त्या मेंढ्याला म्हणाला, "तूं प्रथमतः हंसलास व रडलास याचें कारण काय ?"



मेंढा म्हणाला, "भो ब्राह्मण, मी पांचशें जन्मापूर्वी तुझ्या सारखाच मोठा प्रख्यात ब्राह्मण होतों. त्या जन्मीं वडीलांच्या श्राद्धासाठीं मी एकदांच काय तो एक मेंढा मारला होता. त्या कर्मामुळें मला पांचशें खेपा मेंढ्याच्या कुळांत जन्म घेऊन शिरच्छेद करून घ्यावा लागला. पण माझी शेवटची पाळी असल्यामुळें मी आज या पशुयोनींतून मुक्त होणार आहे, अशा विचारानें मला हर्ष झाला, व त्यामुळें माझें हंसे मला आवरता आलें नाहीं.

पण जेव्हां आपली आठवण झाली तेव्हां मला अत्यंत खेद झाला. आपण ह्या जन्मीचे माझे अन्नदाते आहां, पालनकर्ते आहां, पण ह्या कर्मामुळें आपणाला माझ्यासारिखे मेंढयांच्या कुळांत पांचशें जन्म घ्यावे लागतील, व त्या प्रत्येक जन्मांत शिरच्छेदाचें दुःख भोगावें लागेल, या विचारानें माझें अंतःकरण कळवळलें, आणि माझा शोक अनावर झाल्यामुळें मला रडूं आलें

ब्राह्मण म्हणाला, "शहाण्या मेंढ्या, भिऊं नकोस. मी तुझ्यासारख्या प्राण्याला मारून पशुयोनीत जन्म घेऊं इच्छीत नाहीं. तुझ्या या कळकळीबद्दल मी फार आभारी आहे. आणि आज मी माझ्या शिष्यांसह तुझें रक्षण करीन." मेंढा म्हणाला, "तू आणि तुझ्या शिष्यांनीं माझें कितीहि रक्षण केलें तरी मी आज मरणापासून मुक्त होणार नाहीं. कां कीं, माझें पापच असे बलवत्तर आहे की, शिरच्छेदाचें दुःख भोगल्यावांचून ब्रह्मदेवदेखील त्या पांपातून मला मुक्त करूं शकणार नाहीं !"

ब्राह्मणानें मेंढ्याच्या म्हणण्याकडे लक्ष्य न देतां आपल्या शिष्यांसह त्याच्या रक्षणाचा बंदोबस्त केला. मेंढा गांवाबाहेर एका खडकाच्या बाजूला वाढलेल्या झुडुपाचा पाला खाऊं लागला.

इतक्यांत मोठा कडकडाट होऊन त्या शिळेवर वीज पडली. व तिचें एक शकल उडून त्यानें मेंढ्याची मान धडापासून निराळी केली ! तें आश्चर्य पहाण्यासाठीं पुष्कळ लोक तेथें जमले.

आमचा बोधिसत्त्व या वेळीं तेथें एका वृक्षावर वृक्षदेवता होऊन रहात होता. तो त्या जमलेल्या लोकांना म्हणाला, "मनुष्यप्राणी इहलोकीं जन्म पावणें दुःखकारक आहे असें जर जाणते, तर त्यांनीं इतर प्राण्याचा वध केला नसता ! प्राणघातामुळें किती दुःख भोगावें लागतें हें ह्या मेंढ्याच्या उदाहरणानें स्पष्ट होत आहे !"

बोधिसत्त्वाचा उपदेश ऐकून ते लोक प्राणघातापासून विरत झाले.

# हांजीहांजीपणा विषारी आहे !
## (कुरंगमिग जातक नं. २१)

एकदां आमचा बोधिसत्त्व कुरंगमृग कुलांत जन्मला होता. वयांत आल्यावर अरण्यांत जाऊन तो निरनिराळ्या झाडांची फळें खात असे. एके काळीं एक शिवणीचा वृक्ष फलभारानें विनम्र झाला होता. बोधिसत्त्व त्या वृक्षाखालीं जाऊन वाऱ्यानें पडलेलीं फळें खात असे. पण आमचा बोधिसत्त्व जिव्हालंपट नव्हता. फळें खाण्यापूर्वी आसपास एखादा पारधी दडून बसला आहे किंवा नाहीं, याची तो नीट छाननी करीत असे; आणि मग निर्वाहापुरतीं फळें खाऊन तेथून निघून जात असे.

एके दिवशीं त्या अरण्यामध्यें फिरणारा पारधी त्या शिवाणीच्या वृक्षावर येऊन दडून बसला. बोधिसत्त्व नियमाप्रमाणें एकदम वृक्षाखालीं न येतां कांहीं अंतरावर राहून जवळपास पारधी आहे कीं नाहीं याचें निरीक्षण करूं लागला. वृक्षाखालीं चांगलीं फळें पडलीं नसावीं असा विचार करून पारध्यानें कांहीं फळें तोडून बोधिसत्त्व उभा होता त्या बाजूला फेंकलीं. तरी बोधिसत्त्व तेथून हालेना. तेव्हां पारध्यानें आणखीहि फळें बोधिसत्त्वासमोर फैलावण्याचा क्रम चालविला. तेव्हां बोधिसत्त्व म्हणाला, "बाई शिवाणी, आज तूं माझी फारच हांजीहांजी चालविली आहेस ! रोजच्याप्रमाणें सरळ फळें न पाडितां माझ्या बाजूला दूरवर तूं फळें फेंकीत आहेस ! हांजीहांजीपणा विषारी आहे, हें तत्त्व मला माहीत असल्यामुळें मी तुझा दुरूनच त्याग करून दुसऱ्या शिवाणीच्या झाडाकडे जातों !"

बोधिसत्त्व तेथूनच पळत सुटला. व्याधानें त्याच्यावर शस्त्र फेंकलें; परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं !

# कुसंगतीचें फळ.

## (महिलामुख जातक नं.२६)

वाराणसीराजाचा महिलामुख नांवाचा एक मंगल हत्ती होता. राजाचें त्यावर फार प्रेम असे. एके दिवशीं त्याच्या हस्तिशाळेजवळ मध्यरात्रीच्या सुमारास चोर येऊन मसलत करूं लागले. घराची भिंत अमुक तऱ्हेनें फोडावी, कोणी पकडण्याला आलें तर त्याला कसें ठार मारावें, पेट्या, कपाटें, वगैरे कशीं फोंडावीं, त्या वेळीं मनामध्ये दयेचा अंशदेखील असतां कामा नये, अशा प्रकारच्या गोष्टी करून त्या रात्रीं त्या चोरांनी दरोडा घातला. त्यांत यश आल्यामुळें मसलतीला तें ठिकाण शुभप्रद आहे अशी त्यांची समजूत झाली; आणि ते वारंवार रात्रिसमयीं त्या ठिकाणीं मसलत करूं लागले. त्यांच्या भाषणाचा महिलामुख हत्तीवर इतका वाईट परिणाम झाला कीं त्याच्या अंतःकरणातील दयेचा अंश आटून जाऊन त्यानें प्रथमतः जवळ आलेल्या आपल्या माहुताला ठार मारिलें !



महिलामुख पिसाळला हें वर्तमान राजाला तेव्हांच निवेदित करण्यांत आलें. त्या वेळीं आमचा बोधिसत्त्व राजाचा एक अमात्य होता. राजा त्याला म्हणाला, "पंडिता, हस्तिशाळेंत जाऊन मंगल हत्तीच्या वेडाचें खरें कारण शोधून काढ. इतका चांगला हत्ती एकाएकी वेडावला हें संभवेल तरी कसें ?"

बोधिसत्त्वानें हस्तिशाळेंत जाऊन महिलामुखाला तपासून पाहिलें. परंतु त्याच्या शरिराला कांहीं पीडा झाल्याचें चिन्ह दिसून आलें नाहीं. तेव्हां बोधिसत्त्वानें आसपासची जागा तपासून पाहिली. एका कोंपऱ्यांत घरें वगैरे फोडण्याचीं एकदोन शस्त्रें व चोरांनीं टाकून दिलेल्या कांहीं मोडक्या तोडक्या जिनसा त्याच्या पाहण्यांत आल्या. तेव्हां चोरांच्या मसलती ऐकून हा हत्ती बिघडून गेला असावा अशी त्याची खात्री झाली; आणि राजाजवळ जाऊन तो म्हणाला, "महाराज ! महिलामुखाला दुसरा कोणताहि रोग झाला नाहीं. त्याच्या जवळपास चोरांनीं चालविलेल्या मसलती ऐकून त्याचें मन बिघडून गेलें आहे व तो उन्मत्त झाला आहे ! दुष्ट संगतीचें हें फळ आहे !"



राजा म्हणाला, "पंडिता, पण त्याला सुधारण्याचा कांहीं उपाय आहे किंवा नाहीं ?"

बोधिसत्त्व म्हणाला, "महाराज ! याला सोपा उपाय आहे. सुशील साधुसंताला बोलावून त्याच्या शाळेंत धर्माविषयीं संभाषण करण्यास सांगावें. म्हणजे तो आपोआप सुधरेल."

राजानें वाराणसीच्या आसपास राहणाऱ्या कांहीं साधुसंतांना आमंत्रण करून हस्तिशाळेंत धार्मिक संभाषण करण्यास विनंती केली. त्यांनी तेथें बसून मनुष्यानें शीलवान व्हावें, शांति धरावी, परोपकार करावा, दया वाढवावी इत्यादि गोष्टींची चर्चा केली. ती ऐकून हत्तीचा मद जागच्याजागीं निवाला; व तो पूर्वीपेक्षांहि सौम्य झाला !

राजानें पुनः चोर किंवा धूर्त लोक त्या शाळेंत येणार नाहींत असा बंदोबस्त केला; आणि बोधिसत्त्वाच्या चातुर्याची वाखाणणी करून त्याचा योग्य गौरव केला.

# गरिबी बरी.

(मुनिक जातक नं. ३०)

वाराणसींत ब्रह्मदत्त राजा राज्य करीत असतां बोधिसत्त्व एका कुणब्याच्या गाईच्या उदरीं जन्माला आला. त्याचें नांव महालोहित असें होतें, व त्याच्या भावाला चुल्ललोहित म्हणत असत. त्या घरची सर्व शेती ह्या दोघांवर अवलंबून असे. पण त्यांना खावयाला कडबा व भुसा ह्यांशिवाय दुसरे उंची पदार्थ मिळत नसत. त्याच कुणब्याच्या घरी मुनिक नांवाचा एक डुकर होता. त्याची मात्र चैन असे. त्याला पेज, भात वगैरे पदार्थ यथास्थित देण्यांत येत असत.



तें पाहून चुल्ललोहित महालोहिताला म्हणाला, "दादा, हा काय बरें अन्याय ! आम्हीं ह्या कुटुंबाची सर्व शेतें नांगरतों आणि आम्हांला खावयाला फार झालें तर भुसा. पण ह्या मुनिकाची,

कांहीं काम न करतां, कशी चैन चालली आहे पहा ! सकाळीं उठून पेज भात खाऊन डुरुं डुरुं करीत इकडे तिकडे खुशाल फिरत असतो."

महालोहित म्हणाला, "बा चुल्ललोहिता, तूं असा उतावळा होऊं नकोस. आमच्या मालकाच्या मुलीचें वर्षसहामहिन्यांत लग्न व्हावयाचें आहे, त्या वेळीं मुनिकाची काय स्थिती होते तें पहा; आणि तोंपर्यंत कडब्याभुशांतच संतोष मान."

यजमानाच्या मुलीच्या लग्नसमारंभाच्या दिवशीं चुल्ललोहित वडील भावाजवळ त्वरेनें धांवत आला, आणि आश्चर्यचकित मुद्रेनें म्हणाला, "दादा, तुम्हीं जें म्हणत होतां त्याचा आज अनुभव आला. मुनिकाचे हातपाय बांधून तो आरडाओरड करीत असतां यजमानाच्या नोकरांनीं त्याचा गळा अत्यंत प्रखर सुरीनें चिरला व त्याचे तुकडे तुकडें केले."

महालोहित म्हणाला, "ह्याजसाठीं त्याला पोसण्यांत आलें होतें. रिकामटेकडेपणें जो चैन करतो त्याची अशीच स्थिती होते. श्रम करून खाल्लेला कडबा भुसा चांगला; कारण तें दीर्घायुष्याचें लक्षण होय."

# असभ्यतेनें हानि.
(नच्चजातक नं. ३२)

प्राचीन काळीं प्रथम कल्पांत चतुष्पद प्राण्यांनी सिंहाला आपला राजा केलें. माशांनी आनंद नांवाच्या मत्स्याला, व पक्ष्यांनीं सुवर्णराजहंसाला आपला राजा केलें. त्या सुवर्णराजहंसाची एक अत्यंत सुंदर कन्या होती. तिनें बापाच्या सांगण्यावरून असा वर मागितला कीं स्वयंवर करून जो पति योग्य वाटेल तो मी वरीन. त्याप्रमाणें हंस राजानें हिमालयावर पक्ष्यांचा मोठा समुदाय बोलाविला. एका मोठ्या शिलातलावर सर्व पक्षी गोळा झाले. तेव्हां हंसराजा आपल्या मुलीला म्हणाला, "ह्या पक्षिसंघांतून तुला जो नवरा रुचेल, तो निवडून काढ. तिनें मोराला पसंत केलें. तेव्हां सर्व पक्षी त्याजपाशीं येऊन त्याला म्हणाले, "तूं धन्य आहेस. राजकन्येनें एवढ्या पक्षिसंघांतून तुझीच निवड केली ह्याबद्दल तुझें आम्हीं अभिनंदन करतों."

"परंतु ह्यावरून माझें सामर्थ्य तुमच्या लक्षांत येणें शक्य नाहीं. मला नृत्यकला किती चांगली येतें हें पहा." असें म्हणून त्या पक्षिसमुदायासमोर आपला पिसारा पसरून मोर नाचूं लागला, व त्यायोगें नागडा उघडा पडला. सुवर्णराज हंसाला लाज वाटली, व तो म्हणाला, "ह्याचा आवाज फार चांगला, पृष्ठभाग सुंदर, वैडूर्य मण्यासारखी मान, आणि लांब पिसारा, परंतु ह्याच्या ह्या निर्लज्ज नाचण्यानें माझ्या मुलीशीं ह्याचा विवाह करण्यास मी तयार नाहीं."

असें म्हणून त्यानें त्याच ठिकाणी आपल्या भाच्याशीं आपल्या कन्येचा विवाह केला. मोरानें अत्यंत लाजून तेथून पलायन केलें. असभ्यतेमुळें चांगले गुण व्यर्थ गेले !

# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठानच्या पुस्तक खजिन्यात सातत्याने नवनवीन भर पडत असते. आपण पहाता ना? नवीन सुमारे तीस पुस्तकं लवकरच येत आहेत. सगळीच तुम्हाला हवी असतील तर संपर्कात रहा. VIP सभासद बना.

VIP सभासद बनणं अगदी सोप्पं आहे. आपल्या ओळखीच्या दहा लोकांचे मेल आय डी कळवा आणि बना VIP सभासद.

एका दमात तीन कामं.

1. पहिलं म्हणजे तुम्ही VIP सभासद बनता. तुम्हाला ई साहित्य प्रतिष्ठानचं प्रत्येक पुस्तक घरपोच मिळतं. त्यांच्या प्रत्येक कार्यक्रमाचं आमंत्रण मिळतं. त्यांच्या भावी योजनांची माहिती मिळते. त्यांच्या कामात स्वतः सहभागी होण्याची संधी मिळते.
2. ज्या दहा किंवा अधिक लोकांना तुमच्यामुळे फ़्री पुस्तकं मिळतात ते खुश होतात. त्यांना त्यांच्या आवडीची पुस्तकं मिळाली की ते इतर लोकांना तुमच्याबद्दल सांगतात. त्यांच्यासाठी तुम्ही म्हणजेच ई साहित्यचे प्रतिनिधी बनता.
3. आणि यातून तुम्ही मराठी भाषेच्या संवर्धनाला अमूल्य असा हातभार लावता. आमचा उद्देश आहे मराठीतल्या सहा कोटी साक्षरांना वाचक बनवणं. आणि हे लक्ष्य साध्य करणं हे केवळ आणि केवळ मराठी लोकांना त्यांच्या भाषेवर असलेल्या प्रेमातूनच शक्य आहे. आपल्या भाषेचं राज्य व्हावं म्हणून १०६ हुतात्मे झाले. आपल्या भाषेनं राजा व्हावं म्हणून आपण एक दहा-वीस ई मेल आयडी देणारच ना! वाचनाची आवड असो वा नसो. फ़क्त मराठी

साक्षर अशा दहा लोकांचे ई मेल पत्ते पाठवा. त्यांना वाचनाची आवड आपोआप लागेल. आपणच लावू. लावूच लावू. करूनच दाखवू.

## आहे ना : एक दम : तीन कामं.

संपर्क साधा : esahity@gmail.com

ही सेवा पूर्णपणे निःशुल्क आहे. त्यामुळे आपले मित्र आपल्यावर खुश होतील. शिवाय आम्ही ही खात्री देतो की या ई मेल्सचा वापर फ़क्त आणि फ़क्त मराठी साहित्य पाठवण्यासाठीच केला जाईल. इतर कसल्याही जाहिराती पाठवून त्यांना त्रास दिला जाणार नाही. तेव्हा लवकरात लवकर आपल्या माहितीतल्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला द्या.

अधिक माहितीसाठी, आम्ही कोण ते जाणून घेण्यासाठी एकदातरी www.esahity.com या वेबसाईटला भॆट द्या.

आपल्या पत्राची वाट पहात आहोत.

धन्यवाद

आपले नम्र

टीम ई साहित्य प्रतिष्ठान